# माझें घर

[ आवृत्ति २ री. ]

लेखक

मो. ग. रांगणेकर

कुलवधु, आशीर्वाद, कन्यादान, नंदनवन, अलंकार इत्यादि नाटकांचा.

किंमत १। रुपया

‘नाट्यनिकेतन’चें हें सहावें नाटक. या नाटकाचा १ ला प्रयोग ता. ३१ ऑगस्ट १९४५ रोजीं गोकुळाष्टमीच्या मुहूर्तावर ग्रँटरोडवरील नॉव्हेल्टी थिएटरांत करण्यांत आला. त्यावेळीं पुढील नटनटींनीं कामें केलीं.

| | |
|---|---|
| लक्ष्मी | मंगला रानडे |
| शोभा | ललिता परुळकर |
| शांता | विमल घैसास |
| पार्वतीबाई | बाळाबाई पेडणेकर |
| नारायण | रामचंद्र वर्दे |
| बाजीराव | अविनाश |
| प्रो. शहाणे | नारायण जोगळेकर |
| नाना | व्ही. डी. पंडित |

**संगीत दिग्दर्शक**

**श्रीधर पार्सेकर**

# अंक १ ला

[ साधारण श्रीमंतींत राहाणाऱ्या एका कुटुंबाचें घर. पडदा वर जातो तेव्हां समोर एक प्रशस्त हॉलवजा खोली दिसते. त्याच्या उजव्या व डाव्या बाजूस–प्रेक्षकांपासून जवळ–वरच्या माडीकडे जाणारे दोन जिने आहेत. समोर पिछाडीस हॉलमध्यें येण्याचा दरवाजा व त्याच्या उजव्या बाजूस एक साधारण मोठी खिडकी आहे. जिन्यापलीकडे एक खोलीचा दरवाजा आहे, तसाच डाव्या बाजूसही एक दरवाजा आहे. तेथें असलेल्या फर्निचरमध्यें नव्या–जुन्याचें मिश्रण आहे, त्यामुळें त्या घरांत जुनी पिढी आणि नवी पिढी वास करीत आहे, हें सहजच लक्षांत येण्यासारखें आहे. भिंतीवर फक्त रामपंचायतन, पंचम जॉर्ज बादशहाचें कुटुंब आणि कांहीं जुने 'फॅमिली ग्रुप्स' लटकावलेले आहेत. मधेंच असलेल्या एका राउंड टेबलाजवळील रॉकिंग खुर्चीवर एक जाड पुस्तक घेऊन नारायण बसला आहे, आणि लक्ष्मी खिडकीबाहेर पाहात उभी आहे. ]

**लक्ष्मी** : ( खिडकीजवळून येत ) कशी छान हवा पडली आहे बाहेर !

**नारायण** : ( वाचतां वाचतां किंचित् मागें पाहिल्यासारखें करून ) हो– डिसेंबर महिन्यांत मुंबईत देखील हवा चांगली असते. ( पुन्हां वाचूं लागतो. )

**लक्ष्मी** : ( किंचित् रुष्ट होऊन ) हवा म्हणजे थंडी नव्हे ! एकंदर संध्याकाळच्या प्रसन्न वातावरणाबद्दल म्हणते आहे मी.

**नारा** : हो–प्रसन्न आहे वातावरण—

**लक्ष्मी** : ( मध्येंच ) बाहेर.

**नारा** : हो–बाहेर.

**लक्ष्मी** : आणि अशा वेळीं घरांत कोंडून घेऊन बसायचं म्हणजे अपमानच आहे निसर्गाचा. अशा हवेंत बाहेर फिरायला किती बरं वाटेल ! जाऊंया ?

**नारा** : आपण ?

**लक्ष्मी** : हो–आपण दोघं.

**नारा** : छे:–वेडी आहेस कीं काय तू ? आंत आई आहे—

**लक्ष्मी** : आणि बाहेर नाना आहेत–माहित आहे मला. त्यांच्यापैकीं कुणाबरोबर जायचं नाहीं मला. तुम्हीं चला.

**नारा** : असं वागून कसं चालेल लक्ष्मी ? आज बाहेर फिरायला चल म्हणतेस–उद्यां दोघंच सिनेमाला जाऊंया म्हणशील.

**लक्ष्मी** : म्हणशील कशाला ?–आतां यापुढं म्हणणारच आहे.

**नारा** : छे: छे:–असं वागून कसं चालेल ? आपल्या लग्नाला नुकतीं दोन वर्षं झालीं आहेत—

**लक्ष्मी** : ती पंचवीस होऊन आपण 'रिटायर' झालों, तरी तुम्हीं मला एकटीला घेऊन सिनेमाला जाणार नाहीं–जाणून आहे मी.

**नारा** : आतांपर्यंत काय आपण सिनेमा पाहिले नाहींत ? तुकाराम, ज्ञानेश्वर, रामराज्य, संत सखू,–सगळे आपण तर गेलों होतों !

**लक्ष्मी** : हो–सगळे गेलों होतों–दोघं नव्हे.

**नारा** : दोघांनीच सिनेमा जाऊन पाहाण्यांत काय आहे विशेष ?

**लक्ष्मी** : तेंच एकदा पहा, म्हणजे कळेल. तुम्हांला दोघांनी जाऊन सिनेमा पाहायला आवडत नाहीं–दोघांनी फिरायला गेलेलं आवडत नाहीं–दोघांनीं फोटो काढलेला आवडत नाहीं—

**नारा** : पण त्यावांचून आपलं कांहीं अडलं आहे का ? चांगला संसार चालला आहे आपला.

**लक्ष्मी** : आपला नव्हे–तुमच्या आईवडलांचा म्हणा. तींच दोघं या संसारांतली हीरो–हिरॉईन आहेत; आपण दोघं नुसती भर घालणारीं पात्रं आहोंत. संसार तीं दोघं करताहेत–आपण नव्हे.

**नारा :** मग तुझं म्हणणं काय ? त्यांना दूर सारून आपण संसाराची सूत्रं आपल्या हातीं घ्यायचीं ?

**लक्ष्मी :** हो.

**नारा :** वा !—

**लक्ष्मी :** ऑफिसांतून नाहीं का नानांनी पेन्शन घेतलं ? आणि घरांतच कां ही शेवटपर्यंत सत्ता गाजवायची हांव ? इथं पेन्शन द्यायला साहेब नाहीं म्हणून ?

**नारा :** वाः—संसाराची ऑफिसाशीं काय तुलना करतेस ? वडिल माणूस हा घरांतला कर्ता माणूस असतो, त्याला संसाराचा दीर्घकाळ अनुभव लाभलेला असतो—

**लक्ष्मी :** आणि मग तो आम्हांला केव्हां लाभायचा ? संसार म्हणजे काय, याची जरा तरी तुम्हांला कल्पना आहे ?

**नारा :** मी कशाला बघूं नाना असेपर्यंत ? आणि तूं तरी कां फिकीर करतेस आई असेपर्यंत ?

**लक्ष्मी :** एवढ्यासाठींच, कीं मला आतां या घरांत राहाणं असह्य झालं आहे.

**नारा :** ( ताडकन उठून ) म्हणतेस तरी काय ?–अग, आई ऐकेल—

**लक्ष्मी :** ऐकायलाच हवं त्यांनी–म्हणजे दुसऱ्यांच्या मुली घरांत आणून त्यांचा आपण किती कोंडमारा करतों आहों, तें तरी त्यांना कळेल.

**नारा :** पण तूं अशी वैतागलीस का ? आई तुला कांहीं बोलली ?–नाना कधीं रागे भरले ?—

**लक्ष्मी :** छेः–जगाच्या दृष्टीनं तीं खूप चांगली माणसं आहेत. दुसरीकडे घरांत माझे सासु-सासरे म्हणून मात्र मला तीं असह्य झालीं आहेत. त्यांचा हा चांगुलपणा मला अगदीं नकोसा झाला आहे. मला माझं जिणं म्हणून जगूं दे. तुम्हीं या घरांतच जन्मला

आणि वाढला असल्यामुळें तुम्हांला त्याचं कांहीं वाटेनासं झालं आहे.–तुमचा दोष नाहीं हा. पण मी दुसऱ्या घरून आलेली–स्वतःच्या संसाराच्या नाना उमेदी उराशीं बाळगलेल्या–मला असं दुबळं जिणं काढणं कसं शक्य आहे? अहोरात्र दुसऱ्याच्या ओंजळीनं पाणी पीत मी जन्म कसा काढूं? आणि मलाही तुमच्याबरोबर असलं हें जिणं जगायला लावण्यांत तुम्हांला तरी काय सुख वाटतं?

**नारा** : अग, आपलं लग्न केलं त्यांनीं तें कशाला?

**लक्ष्मी** : असं जिणं जगायला?

**नारा** : काय कमी आहे इथं? दुसरी कुणीही असती, तर या घरांत पडल्याबद्दल तिनं स्वतःला भाग्यवान मानलं असतं. आणि तुझं आपलं हें कांहींतरीच.

**लक्ष्मी** : सुरवातीला मीही मला भाग्यवान मानलंच कीं.

**नारा** : मग आतांच कां विटलीस?

**लक्ष्मी** : कारण हें सुख माझ्या अंगीं लागेना. मी या घरांत किती परस्वाधीन आहे–दुबळी आहे, याची मला पदोपदीं जाणीव होते आहे, तसतसं माझं मन या सुखाला विटत चाललं आहे. मला दोन वेळां सुग्रास जेवण मिळतं, कपडे मिळतात, दागिने मिळतात–पण अन्नवस्त्र आणि अलंकार हेंच सुखाचं साधन असतं, तर गरीबांच्या झोपडींत आज जें समाधान आढळतं तें आढळलं नसतं; आणि श्रीमंतांच्या घरांत दुःखीकष्टी जीव असे सुस्कारे सोडतांना दिसले नसते. मला इथं बरं वाटत नाहीं.

: मग काय करावं म्हणतेस?

**लक्ष्मी** : मला माझं सत्तेचं घर हवं.

**नारा** : अग, मग हें घर आपलंच नाहीं का?

**लक्ष्मी** : छेः–तुमच्या आईवडलांचं.

**नारा** : अग, म्हणजे आपलंच. त्यांना तरी आहे कोण ? मी आणि बाजीराव. शांता काय, लग्न झालं कीं निघून जाईल.

**लक्ष्मी** : स्वतःच्या घराबद्दल तुमच्या एवढ्याच कल्पना आहेत ?

**नारा** : मग आणखी काय असायच्या ?

**लक्ष्मी** : मी तुम्हांला दोष देत नाहीं. ज्या वातावरणांत तुम्हीं वाढला आहां, त्या वातावरणानं तुम्हांला असं दुबळं केलं आहे.–जाऊंदे– मला आणखी जास्त कांहीं सांगायचं नाहीं—पण आज तुम्हीं नानांना स्पष्ट सांगितलं पाहिजे—

**नारा** : काय तें ?

**लक्ष्मी** : आपल्याला निराळं बिऱ्हाड करून राहायचं आहे.

**नारा** : लक्ष्मी !—काय बोलते आहेस तूं हें ?–कुणी भरवलं तुझ्या डोक्यांत हें ?

**लक्ष्मी** : दुसऱ्याच्या विचारानं चालणारी मुलगी तुम्हीं बायको म्हणून आणलेली नाहीं, हें ठाम ध्यानांत ठेवा.

**नारा** : अग, पण हें असलं सोन्यासारखं घर सोडून कुठं तरी चाळींतल्या दोन खोल्यांत जाऊन राहायचं—छे :, माझ्या तर अंगावर कांटाच येतो.

**लक्ष्मी** : यायचाच. पण तो यायला हवाच आहे. त्याशिवाय या घराबाहेर केवढं अफाट जग पसरलं आहे, याची तुम्हांला कल्पना येणार नाहीं. चाळींतल्या दोन खोल्यांत केवढं सुख भरलेलं आहे, तें तुम्हांला तिथं जाऊन माझ्याबरोबर राहिल्याशिवाय कळायचं नाहीं. दोघांनीं सिनेमा जाऊन पाहाण्यांत काय सुख असतं, हें देखील तुम्हांला माहित नाहीं, तर चाळींतल्या दोन खोल्यांत काय सुख आहे, हें तुम्हांला कुठून कळणार ? पण यापुढं मी तुम्हांला खरं सुख काय असतं, याचा पूर्ण अनुभव देणार आहे.

**नारा :** पण त्यासाठीं या घरांतून बाहेर कशाला जायला हवं ?

**लक्ष्मी :** कारण या घराबाहेरच तें सुख आहे.

**नारा :** छे : छे :, मला तर ही कल्पनाही सहन होत नाहीं. नानांना सांगायचं मी निराळं बिऱ्हाड करून राहाणार आहे म्हणून ? (कल्पनेनें ती परिस्थिति आपल्या डोळ्यापुढं उभी करीत) समज—हे नाना—ही आई—हा मी—आणि—( तोंडांतून शब्द काढण्याचा प्रयत्न करीत ) नाना—म—मी—( सारखे आवंढे गिळतो. ) छे :—शब्द देखील फुटणार नाहीं माझ्या तोंडून.

**लक्ष्मी :** ठीक आहे—मी सांगेन.

**नारा :** नको—नको—अग, तुला कल्पना नाहीं. नाना संतापले म्हणजे घर डोक्यावर घेतील.

**लक्ष्मी :** एकदांच घेतील.

**नारा :** तरी पण—छे :—आज कुठून तुझ्या डोक्यांत हें वारं शिरलं आहे कळेनासं झालं आहे मला.

**लक्ष्मी :** आज ? किती दिवस मी स्वतःच्या मनाचा कोंडमारा करून घेतला; पण आज त्याला तोंड फुटलं. कारण—कारण आज आपणा सर्वांचा फोटो काढायचं नानांनी ठरवलंय.

**नारा :** अरे हो—विसरलोच मी. तयारी करायला हवी आपल्याला. चल.

**लक्ष्मी :** आपल्याला नव्हे—बाकीच्यांना.

**नारा :** म्हणजे ? आपण नाहीं बसायचं फोटोला ?

**लक्ष्मी :** छे :.

**नारा :** हें एक आणखी तुझं दुसरं. झालं आहे तरी काय तुला आज ?

**लक्ष्मी :** कांहीं नाहीं. फक्त स्वतःच्या दुबळेपणाचा वीट आला आहे. फोटो काढायचा आहे म्हणे सगळ्यांचा ! तुमच्या आईनं लग्नांतला

तो नऊ वारी शालु नेसायला सांगितला आहे, नाकांत नथ घालायला सांगितली आहे, अंगावर टोपलीभर दागिनेही घालायला सांगितले आहेत—

**नारा** : हो–मलाही नानांनीं लग्नांतला सिल्कचा लॉंग कोट आणि जरीकांठी धोतर काढून ठेवायला सांगितलंय. आत्तां येतील ते–चल–आपल्याला उशीर झाला तर रागवायचे उगाच.

**लक्ष्मी** : मी काढून ठेवलं आहे तें सारं.

**नारा** : अग, मग मला सांगितलं नाहींस तें. चला—

**लक्ष्मी** : नानाबरोबर पाठवायचं आहे तें.

**नारा** : कुठं ?

**लक्ष्मी** : फोटो काढायला ! शालूचा आणि रेशमी कोटाचा फोटो काढायचा आहे–आपला नव्हे कांहीं.

**नारा** : थट्टा काय करतेस भलत्याच वेळीं ?

**लक्ष्मी** : ही भलती वेळ नव्हे. तुम्हीं आणि मी आतां आहों तसेच फोटोसाठीं निघालों, तर नानांना तें चालेल ? छेः–म्हणून म्हटलं मी, फोटो आपला नाहीं काढायचा–माझ्या शालूचा आणि तुमच्या रेशमी कोटाचा.

**नारा** : हो–पण तो आपल्या अंगावर तर घालायला हवा !

**लक्ष्मी** : आणि तो घालून घरांतली पाळीव जनावरं म्हणून सर्वांनीं उभं राहायचं ! नानांच्या हातांत रिंगमास्तरसारखा चाबूक असेलच ! –कांहीं जायचं नाहीं फोटोला.

**नारा** : अग, पण सबंध फॅमिलीचा ग्रुप काढायचा, तिथं मीं आणि तूं न राहून कसं चालेल ?

**लक्ष्मी** : आपण निराळा काढून घेऊं दोघांचा.

**नारा** : दोघांचा निराळा ? आणि या घरांत ? बघ–बघ हे सारे फोटो. ' फॅमिलीग्रुप ' शिवाय एक तरी फोटो दिसतो का तुला या घरांत नानांना तर अशा एकट्या–दुकट्याच्या फोटोची अगदीं चीड आहे. कुटुंबांतली सगळीं माणसं एकोप्यानं राहायला पाहिजेत, तर असे वेगवेगळे फोटो काढणं, वेगवेगळं फिरायला जाणं, वेगवेगळं सिनेमाला जाणं उपयोगी नाहीं, असं त्यांचं मत आहे. म्हणून लग्न झाल्यानंतर आपला दोघांचा देखील फोटो काढला नाहीं.

**लक्ष्मी** : आणि नानांनी आपल्या स्वतःच्या लग्नानंतर सासुबाईबरोबर आपलाही फोटो काढला नाहीं–हेही माहित आहे मला.

**नारा** : आहे ना माहित ?–झालं तर. घरांतल्या सगळ्या मंडळीचा 'ग्रुप' असला कीं झालं.

**लक्ष्मी** : हो–म्हणजे पुढच्या पिढीला कळायला बरं, कीं आपल्या मागच्या पिढींत एवढी दुबळी माणसं जगून गेलीं ! मला ही स्वतःबद्दल लाजिरवाणी नोंद करून ठेवायची इच्छा नाहीं. ' फॅमिलीग्रुप ' म्हणे ! एका गोठ्यात कोंबून भरलेल्या जनावरांप्रमाणं एका घरांत माणसं कोंबून त्यांच्यावर ' फॅमिली ' हें लेबल लावलं कीं झालं ! कुटुंबांतल्या माणसांत परस्परांबद्दल काय भावना आहेत, हें बिचाऱ्या फोटोग्राफरला काय माहीत असणार ? तो त्यांना एकमेकाजवळ बसवून फोटो काढतो आणि उद्यां तो या भिंतीवर लटकायचा ' फॅमिलीग्रुप ' म्हणून ! मला वाटतं, भिंतीवर लावलेल्या ह्या साऱ्या ' फॅमिलीग्रुप ' मधली माणसं जिवंत झाली, तर आपापल्या जागेवरून उठून चौकटीबाहेर चालती होतील.

**नारा** : पण आतां नाना आले—

**लक्ष्मी** : म्हणजे त्यांना स्पष्ट सांगा—

**नारा** : नाहीं बुवा–आपल्याला नाहीं जमायचं तें. मी आपला कपडे करतो. उगाच ते भडकले तर—

[ असें म्हणत आंत जातो. लक्ष्मी त्याच्याकडे पाहात तेथेंच राहाते. त्याच्या दुबळेपणाची तिला चीड येते. पण नंतर त्याची कींव वाटून ती एका खुर्चीवर बसते.

**लक्ष्मी :**

**शिणले रे प्रभु आतां ।**
**जीवन ऐसें वांया जगतां ॥ धृ० ॥**
**अंतरीं माझ्या फुलल्या आशा ।**
**भाग्यवती मी गणिले वांया ।**
**स्वप्नचि सारें भासे मजला ॥ १ ॥**

गाणें संपतांच माडीवरून बाजीराव कपडे घालून येतो. त्याच्या अंगांत फक्त ' बुश कोट ' आणि विजार आहे. डोक्याला टोपीही नाहीं. ]

**बाजीराव :** ( लक्ष्मीला स्वस्थ बसलेली पाहून ) आं–वहिनी ? आणि हें काय ? तूं अजून शालू नेसली नाहींत ? केस विंचरले नाहींस ? अशी लंकेची पार्वती बनून फोटोला बसणार आहेस कीं काय ?–मग त्या शंकरालाही सांगायला हवं–नुसती लंगोटी लावून अंगाला भस्म चोपड म्हणून ! कुठं गेला तो ?

**लक्ष्मी :** आंत कपडे करायला गेले आहेत.

**बाजी :** आणि तूं अशीच येणार ? छट् ! नानांची सून म्हणजे लफ्फेदार शालू नेसून, नाकांत नथ घालून आणि अंगांवर सोन्या-मोत्यांचे दागिने घालून फोटोला बसली पाहिजे !

**लक्ष्मी :** ते सारं घेऊन जा तुम्ही फोटोंत ठेवायला.

**बाजी :** आणि तूं ?

**लक्ष्मी :** माझी काय जरुरी ?

**बाजी :** वाः–'फॅमिली–ग्रुप' आहे हा–आणि तूं गैरहजर ? मग काय नारायण शालु आणि दागिने हातांत घेऊन बसणार आहे फोटोंत ?

**लक्ष्मी :** काय हरकत आहे ? कुणी तरी कुटुंबांतलं प्रतिनिधी म्हणून असलं कीं झालं !

**बाजी :** मग सगळ्यांनीच तसं करायला हरकत नाहीं. तुझा शालु, माझा 'बुश-कोट', नारायणाचं जरीकांठी धोतर, नानांचा जांभळा रुमाल, आईची पैठणी आणि शांताची बोरमाळ—छान ! सुंदर कल्पना आहे. ह्या सगळ्या फोटोंत हा फोटो उठून दिसेल, नाहीं ?

**लक्ष्मी :** सांगून पहा तुमच्या नानांना !

**बाजी :** पण काय ग वहिनी, तूं खरंच येणार नाहींस कीं काय ?

**लक्ष्मी :** हं.

**बाजी :** कां ? नारायण भांडला—बिंडला कीं काय ?

**लक्ष्मी :** ते भांडणार ? या घरांत भांडायला शिकवणार कोण त्यांना ? भांडायला स्वतंत्र बुद्धी असावी लागते.

**बाजी :** खरंच—नारायण कधीं भांडत देखील नसेल नाहीं तुझ्याबरोबर ? कशी काढलीस ग दोन वर्षं तूं ?

**लक्ष्मी :** तुम्ही कशी काढतां तें पाहाणारच आहे मी.

**बाजी :** मी ?—अग, अजून लग्न झालं नाहीं तर भांडणाशिवाय पाऊल उचलत नाहीं आमचं !

**लक्ष्मी :** अस्सं ! म्हणजे लग्न—विग्न सारं जमवून ठेवलं आहे म्हणायचं ! घरांत माहित आहे का कुणाला ?

**बाजी :** आत्तां होईल. तिलाच घेऊन यायला निघालो आहे मी.

**लक्ष्मी :** आत्तां ?

**बाजी :** हो—फोटोंत नको का माझ्या शेजारीं कुणी ? 'फॅमेली-ग्रुप' मध्यें हवीच ती पुन्हां कोण काढणार आहे ?

**लक्ष्मी :** पण तुमचं लग्न झालं आहे कीं काय ?

**बाजी** : छेः–तें होईल सावकाश. पण आतां कुटुंबांतल्या साऱ्यांचा फोटो काढायचा आहे तर तिलाच कां वगळा! म्हणून म्हटलं घेऊन यावं. अनायासें साऱ्यांना कळेलही. केव्हांतरी सांगायला हवंच. ही संधि बरी आहे, नाहीं?

**लक्ष्मी** : बरेच धीट दिसतां! या घरांत हा धीटपणा आणलात कुठून?

**बाजी** : ऊं:–मला नारायण समजूं नकोस. तो अगदींच दादा आहे!

**लक्ष्मी** : या घरांत तसं वागावं लागतं.

**बाजी** : कोण म्हणतं?—आतां ही मुलगी (खिशांतून एक फोटो काढून तिच्यापुढें धरीत)–पाहिलीस? नानांना सांगणार आहे, हिच्याशीं मी लग्न करायचं ठरवलं आहे. बोला, पसंत आहे की नाहीं तुम्हांला?

**लक्ष्मी** : आणि त्यांनी नाहीं म्हटलं तर?

**बाजी** : लग्न करणार मी तिच्याशीं!

**लक्ष्मी** : ते घरांत ठेवणार नाहींत तुम्हांला.

**बाजी** : हात्तिचा! जाईन मी.

**लक्ष्मी** : जाल? या घरांतून निघून जाल?

**बाजी** : खात्रीनं. एवढी मोठी मुंबई आहे–ती कांहीं सगळी नानानीं भाड्यानं घेतलेली नाहीं. कुठंही दोन खोल्या मिळतील आम्हांला राहायला! (लक्ष्मी अस्वस्थ होते. पुन्हां तिला फोटो दाखवीत) कशी आहे?

**लक्ष्मी** : चांगली आहे.

**बाजी** : अग, नुसती चांगली नाहीं–फार फार चांगली आहे. सारखी हंसत असते–आणि सारखी चिमणीसारखी चिवचिव करीत असते. इतकी कांहीं चांगली आहे म्हणून सांगूं–सांगतांच येत नाहीं मला. तूं हंसशील मला–पण मी तिच्यावर एक गाणं देखील केलं आहे. म्हणूं?

**लक्ष्मी :** ( अजून त्याच अस्वस्थ मनःस्थितींत ) हं.

[ बाजीराव डाव्या बाजूच्या खोलीचा एकदा कानोसा घेऊन येतो, बाहेरच्या दरवाजांतून लांब पाहातो आणि नंतर गाणें म्हणतो. ]

**बाजीराव :**

**तूं हंसतां साजणे ! चांदणें गेलें कोमेजुनी ॥**
**तूं वदतां सखये ! थांबले निर्झर हे लाजुनी ॥ ध्रु० ॥**
**पुष्पलता उद्यानीं बघ ह्या । नमल्या तुज पाहुनी ॥**
**मूक जाहल्या धुंद कोकिला । गीत तुझें ऐकुनी ॥ १ ॥**
**वनराजांची झाली दाटी । बघण्या नाजुक कटी ॥**
**मृगहि झाले शंकित तैसे । लोचन तव पाहुनि ॥ २ ॥**
**लपल्या जलदेवता पाहतां । तुजला सागरतिरीं ॥**
**येति अप्सरा भूवरि बघण्या । रूप तुझें चोरुनी ॥ ३ ॥**

**बाजी :** कसला विचार करतेस ?–हं–दादानं आपल्यावर का गाणं केलं नाहीं, असं वाटत असेल तुला बहुतेक !

**लक्ष्मी :** छेः, मी असा विचार करते आहे, कीं असल्या मुलीचं या घरांत कसं जमणार ?

**बाजी :** नाहीं जमलं तर आमचा मार्ग आम्हांला मोकळा आहे. सांगितलंच मी तुला.

**लक्ष्मी :** हो–पण घरांतून निघून जाणं इतकं सोपं आहे ?

**बाजी :** मी जाईन.

**लक्ष्मी :** तुमचा दादा गेला असता ?

**बाजी :** तो ? नांव काढूं नकोस. अगदीं नानांचा अवतार आहे तो ! त्यांनीं घालवलं तरी देखील परत येईल.

**लक्ष्मी :** कुटुंबांत राहायचं म्हणजे असं वागावं लागतंच.

**बाजी :** तूंही त्याचीच बायको !

**लक्ष्मी :** म्हणून म्हणत नाहीं मी. पण एका कुटुंबाची अशी शकलं झालीं तर कुटुंबसंस्थाच नाहींशी होईल, असं नाहीं तुम्हांला वाटत ?

**बाजी :** हें बघ, दहा माणसं एका घरांत परस्पराशीं धुसफुसत राहण्यापेक्षां त्याचीं पांच वेगवेगळीं स्वतंत्र घरं झालेलीं मला जास्त पसंत आहेत. आतां हीच मुलगी ! तुला काय वाटतं–तुझ्यासारखी नऊ वारी लुगडी नेसून घरांत चोव्विस तास बसून राहणार आहे ही इथं आल्यावर ? नांव काढूं नकोस.

**लक्ष्मी :** मग तुम्ही दोघंच बाहेर जाणार ?

**बाजी :** हो–दोघंच फिरायला जाऊं, नाटकाला जाऊं, सिनेमाला जाऊं ! आणि कपड्याचा तर तिला इतका षोक आहे, कीं विचारूं नकोस. आतां ती फोटो काढायला येणार ती कुठले कपडे घालून असं वाटतं तुला ? नऊ वारी शालू नेसून आणि नाकांत नथ घालून ?

**लक्ष्मी :** मग ?

**बाजी :** पंजाबी कपडे घालून.

**लक्ष्मी :** असं.

**बाजी :** पाहशीलच तूं.

**लक्ष्मी :** पण नाना, तुमची आई—

**बाजी :** आईनं घालूं नये वाटलं तर पंजाबी कपडे–म्हणून माझ्या बायकोनंही ते घालूं नयेत कीं काय ?

**लक्ष्मी :** पण या घरची तशी रीत नाहीं.

**बाजी :** आई आणि नानांच्या वेळीं नसेल–आतां आम्ही ती पाडली पाहिजे. पिढ्यान् पिढ्या या घरांतल्या सुनांनी नऊ वारी लुगडी नेसून आणि नाकांत नथी घालूनच मिरवायचं कीं काय ?

**लक्ष्मी :** मला नाहीं वाटत, नाना तिला असल्या कपड्यांत फोटो-साठीं उभं राहूं देतील.

**बाजी :** राहिलं.–आम्ही दोघं निराळा फोटो काढूं.

**लक्ष्मी :** या घरांत एक तरी जोडप्याचा फोटो दिसतो का तुम्हांला ?

**बाजी :** फोटो काढण्यासारखीं जोडपीं होती कुठं अगोदर ?

**लक्ष्मी :** आमचाही काढला नाहीं.

**बाजी :** तुम्हीं काढायचा कधीं मनांतच आणला नाहीं.

**लक्ष्मी :** का–आम्हांला हौस नाहीं ?

**बाजी :** हौस असली तरी धैर्य हवं ना ?–बघ, नारायण आतां लग्नांतल्या नवऱ्यासारखा लांब रेशमी कोट, जरीकांठी धोतर वगैरे नेसून तयार होईल !–पण तूं काय ठरवलं आहेस ?

**लक्ष्मी :** फोटोला न यायचं.

[ निघून जाते. बाजीराव क्षणभर आश्चर्यानें ती गेलेल्या दिशेनें पाहात राहतो आणि त्याच स्थितींत बाहेर निघून जातो. थोडा वेळ स्टेज मोकळेंच असतें. नंतर बाहेरच्या दरवाजानें खांद्यावर बंदुकीसारखी छत्री घेऊन व हातांत काठी घेऊन नाना येतात. ]

**नाना :** नारायण–शांता–बाजी–अरे,–झाला का तयार ? आटपा लवकर.

**शांता :** ( माडीवरून जिन्यावर येत ) नाना–फक्त पावडर लावायची राहिली आहे–आत्तां येते लावून. ( पुन्हां वर जाते. )

**नाना :** आणि नारायण कुठं गेला ?

**नारा :** ( आंतून टोपीवर ब्रश मारीत येत ) आलों नाना. झालोंच आहे मी तयार.

**नाना :** ( माडीवर जातां जातां ) आणि लक्ष्मी झाली का तयार ?–आणि घरांत तयारी झाली का बघ. आलोंच मी कपडे बदलून.

[ माडीवर जातात. नारायण आंतल्या खोलींत पाहतो, खोलीपर्यंत जातो, परत येतो. डाव्या बाजूच्या दरवाजांतून नाकांत नथ अडकवीत पार्वतीबाई येतात. ]

**पार्वतीबाई :** काय रे नारायण, झाली का लक्ष्मी तयार? म्हणावं, हातांत पाटल्या घाल. गोठही हवेत. आणि तो चंद्रहारही घाल म्हणावं.–आणि शालु कुठला नेसली आहे? तो पोपटी का अंजिरी? अंजिरीच नेस म्हणावं. त्याचा फोटो चांगला येईल.–आणि ही शांता काय करते आहे अजून? शांता–ए शांता, झाली नाहीं का तयारी अजून?

**शांता :** (तोंडावर हात फिरवीत येत) आले ग आई. केव्हांच झालं आहे माझं. पावडर लावीत होतें.

**पार्वती :** ती कशाला आणखी? तिचा का फोटो येणार आहे? तुम्हां पोरींचं आपलं कांहींतरीच एक एक.

**शांता :** आणि वहिनीचं झालं नाहीं वाटतं? काय रे दादा?

**नारा :** (गोंधळून) हो–होतं आहे–येईल.

**शांता :** आई, मी कुठं बसायचं ग फोटोंत?

**पार्वती :** अग, बसायला कशाला हवं साऱ्यांनीच?–हा फोटो बघ. यांत चार माणसं मागे बसलीं आहेत, आणि हे दोघे दोन बाजूला गालावर एक हात घेऊन लांब पाय करून पुढें बसले आहेत.

**शांता :** मी आणि बाजीराव–दोघांनी असं पुढें बसायचं वाटतं?

**पार्वती :** अग, तुमची दोघांची लग्नं झाली नाहींत ना? या बाजूला मी आणि हे; आणि त्या बाजूला नारायण आणि लक्ष्मी. तुझं लग्न झालं असतं तर तूंही नसतीस का नवऱ्याबरोबर बसलीस?

**शांता :** नाना खटपट तरी कुठं करताहेत माझ्या लग्नाची?

**नारा :** कॉलेजांत नाहीं का कुठं जमत?

**शांता :** तिथलीं पोरं म्हणजे पोरंच आहेत तीं! मुलींना नांवं ठेवायला सांगा त्यांना. अग, मलाही 'मावशीबाई' नांव ठेवलं आहे त्यांनी!

**पार्वती :** कां ग?

**शांता :** अग, मी लुगडं नेसून आणि आंबाडा घालून जाते ना कॉलेजांत ?

**पार्वती :** मग बाकीच्या मुली काय पाटलुणी घालून येतात ?

**शांता :** नाहीं ग. पण गोल नेसायची आणि वेणीचे दोन शेपटे पाठीवर टाकायची फॅशन आहे कॉलेजांतल्या मुलींची ! आणि मुलांशी सारख्या फिदीफिदी हंसत बोलत असतात. मी त्यांच्या वाऱ्याला उभी राहात नाहीं, म्हणून मला 'मावशीबाई' नांव ठेवलं आहे त्यांनी.

**पार्वती :** म्हणेनात कार्टे. मुलींच मिसळूं नको तूं त्यांच्यांत. होईल लग्न व्हायचं असेल तेव्हां ! जन्माला घातली आहे तुला देवानं, तो कुठं तरी मंगळसूत्राची सोय करून ठेवीलच.—बाजीराव कुठं गेला ? वर आहे का ग ?

**शांता :** छे :, तो मघाच आला होता खालीं.

**पार्वती :** याच वेळीं कुठं गेला ? पाय टिकत असेल तर शप्पथ त्याचा घरांत.

**शांता :** अग आई, त्याच्या खिशांत एक फोटो पाहिला मी मघां. कपडे बदलीत होता, तेव्हां कोटांतलं सामान काढून टेबलावर ठेवलं होतं त्यानं; त्यांत तो फोटोही दिसला मला.

**पार्वती :** कुणाचा ?

**शांता :** मुलगीच होती. तो पंजाबी ड्रेस म्हणतात ना, तो केला होता तिनं.

**पार्वती :** हें काय बाई आणखी ? कुणाच्या भानगडींत पडला आहे कीं काय ? दिसतच होती चिन्हं मेल्याची ! कसली घाई झाली होती त्याला ? चांगल्या सोन्यासारख्या मुली सांगून येताहेत दोनदोन-तीनतीन हजार रुपये हुंडा देऊन !

**शांता :** पण हल्लीं फॅशन निघाली आहे ना आई, प्रेमांत पडून 'लव्ह-मॅरेज' करायची ? प्रेम बसलं कीं कसलीही नकटी–आंधळी मुलगी चालते !

**पार्वती :** ही तशांतलीच आहे कीं काय ?

**शांता :** फोटोंत काय कळणार ? हबशीण असली तरी युरोपियन दिसायची.

**पार्वती :** असले ग कसले हे फोटो ? आतां आमचा कसा येतो कोण जाणे ! कधीं जन्मांत बसले नाहीं फोटोला. लग्न झालं आणि दुसऱ्याच वर्षांत मामंजी गेले–नाहींतर सगळ्यांचा फोटो काढायचा होता हा नारायण झाला तेव्हां.

**नाना :** ( माडीवरून फोटोचे कपडे घालून येत ) चला, झाले का सगळे तयार ?

**शांता :** पण बाजीराव आहे कुठं ?

**नाना :** पहा, त्याला जातांना चारचारदा बजावून सांगितलं होतं, कीं अगदीं कुठं बाहेर जाऊं नकोस, आणि गेलास तर वेळेवर ये. पण त्याच्या पायावर नक्षत्र पडलं आहे ना !

**पार्वती :** गेला असेल पंजाबला !

**नाना :** पंजाबला ?–म्हणजे ?

**पार्वती :** कुणीशी पंजाबीण पाहिली आहे म्हणे त्यानं. हीच सांगत होती आतां.

**नाना :** काय ग शांता ? काय भानगड आहे ही ?

**शांता :** किनई नाना, त्याच्या खिशांत मघा मीं कुणाचासा फोटो पाहिला. पंजाबी ड्रेस घालून काढला होता. कोण कुठली आहे कोण जाणें !

**नाना :** म्हणजे–नारायण, काय प्रकार आहे हा ?

**नारा** : मला कुठं काय सांगितलं आहे त्यानं? पण आल्यावर विचारायला हवं त्याला.

**नाना** : अलबत विचारायला हवं. म्हणजे आहे काय हें? घरांत सून आणायची, ती आम्हीं का त्यानं? बाजीरावच दिसतो मोठा!

**पार्वती** : मोठ्या प्रेमानं बाजीराव नांव ठेवलंत ना त्याचं! तें खरं करून दाखवतो आहे.

**नाना** : तें आपलं आम्हीं पेशव्यावरील प्रेमानं ठेवलं. म्हणून काय हाही बाजीराव मस्तानी घेऊन येणार? अरे वा:!–आणि लक्ष्मी कुठं दिसत नाहीं ती?

**शांता** : खरंच–काय ग करते आहे ती अजून?–वहिनी, ए वहिनी–

[ लक्ष्मी आंतून येते. ती गोल जॉर्जेटची साडी नेसली आहे, पाठीवर केसाचा शेपटा सोडला आहे, हातांत दोनदोन सोन्याच्या बांगड्या आहेत. तिचा तो वेष पाहून सगळे थक्क होतात. नारायण तर एकदा तिच्याकडे आणि एकदा नानाकडे पहात कमालीचा गोंधळून जातो. ]

**पार्वती** : अगबाई हें काय?
**शांता** : हें काय वहिनी?
**नाना** : आं! म्हणजे आहे काय हें?

**पार्वती** : अग, हें ग काय नेसलीस?

**लक्ष्मी** : हें ना? जॉर्जेटचं पातळ आहे.

**शांता** : आणि कॉलेजांतल्या मुलीसारखा शेपटा काय सोडला आहेस, वहिनी?

**लक्ष्मी** : तुम्हीं कॉलेजांत जाता ना?

**शांता** : हो–पण मी देखील शेपटा सोडीत नाहीं.

**लक्ष्मी** : कां—वाईट दिसतो?

**पार्वती** : दिसतो म्हणजे? या घरांतली सून आहेस ना तूं?

**लक्ष्मी** : हो—मग काय झालं?

**पार्वती** : काय म्हणजे ? चांगला शालू नेसायला सांगितला होता तुला, तें सोडून हें फडकं गुंडाळलं आहेस–आणि केस बांधायचे सोडून असा पाठीवर शेपटा सोडला आहेस !

**शांता** : आणि हातांत बघ–गोठ नाहींत, पाटल्या नाहींत–कांहीं नाहीं.

**पार्वती** : झालं आहे तरी काय तुला आज ?

**लक्ष्मी** : कांहीं नाहीं. हें पातळ नेसावंसं वाटलं मला आज.

**नाना** : अग, पण फोटो काढायला जायचं आहे–सांगितलं होतं ना तुला ?

**लक्ष्मी** : हो.

**नाना** : मग हें काय ?

**लक्ष्मी** : फोटो माझा काढायचा आहे, असं वाटलं मला. माझ्या शालूचा आणि दागिन्यांचा फोटो काढायचा असला, तर ते घेऊन जा बरोबर. मग मी कशाला आणखी येऊं ?

**नाना** : काय रे नारायण, काय म्हणते आहे ही ?

**नारा** : ( गोंधळून ) म्हणजे–ही–अग,—

**नाना** : असं ‘ तत पप ’ काय करतोस ? हा फोटो काढायचा का अवतार ? सून ना ही आमची ?

**लक्ष्मी** : सुनेचा पोषाक म्हणून आणखी वेगळा असतो कीं काय ?

**नारा** : अग, पण हा चांगला दिसत नाहीं.

**लक्ष्मी** : मला चांगला वाटतो. तुमच्या कोणाच्या कपड्यांच्या बाबतींत मी कुठं ढवळाढवळ केली आहे ?

**नाना** : तूं सून आहेस घरांतली. हें घर आमचं आहे. इथं आम्ही म्हणूं तसं सगळ्यांनीं राहायला हवं.

**लक्ष्मी** : ( नारायणास ) ऐकलंत ?–काय म्हणालें होतें मी तुम्हांला ! हें घर यांचं आहे, हा संसार यांचा आहे—

**पार्वती** : हो हो–आहे म्हणजे आहेच—

**लक्ष्मी** : ऐका. मघां मी म्हटलं तेव्हां तुम्हांला पटलं नाहीं. आतां काय म्हणणं आहे तुमचं ?

**नाना** : तो आणखी निराळं काय सांगणार ? आमचीं मतं तीं त्याचीं मतं. कुटुंबांत प्रत्येकाला मत असून चालत नाहीं. घरांतल्या कर्त्या माणसानं जें ठरवलं तें सगळ्यांनीं ऐकलं पाहिजे; तरच कुटुंबसंस्था टिकते. प्रत्येकाला मतस्वातंत्र्य असलं तर एका घराची दहा शकलं होतील. मी जिवंत आहें तोंपर्यंत माझ्या मतानंच साऱ्यांनीं चाललं पाहिजे.

**लक्ष्मी** : आणि कोणाला तीं पटलीं नाहींत तर ?

**नाना** : पटली नाहींत म्हणजे काय–पटायलाच हवीत. गुण्या-गोविंदानं संसार चालवायचा म्हणजे प्रत्येकाचीं स्वतंत्र मतं असून चालायचीं नाहींत. एकाचं मत तें सगळ्यांचं मत.–सोडून ये हें पातळ आणि शालू नेस.

**शांता** : आणि चांगला आंबाडा बांध केंसाचा.

**पार्वती** : आणि अशी उघड्या हातांनीं येऊं नकोस. गोठ-पाटल्या घाल.

**शांता** : आणि नाकांत नथ नको का ?

**लक्ष्मी** : मला काय एखादी देवळांतली देवी समजला तुम्ही ?

**नाना** : नारायण, तुझी बायको आज भारी चढेल झालेली दिसते आहे !

**पार्वती** : कधीं आजपर्यंत एक ब्र काढला नाहीं तोंडून आणि आजच काय हिला झालं म्हणते मी ?

**नाना** : मला उलटून जबाब देते ! हिच्या नवऱ्यानं कधीं हूं कीं चूं केलं नाहीं इतक्या वर्षांत ! आणि ही येऊन दोन वर्षं झालीं नाहींत तर उलट उत्तरं द्यायला लागली !

**लक्ष्मी** : यांचा जन्म इथंच झाला आणि हे वाढलेही इथंच. मी दुसऱ्या घरांतून इथं आले आहे–माझीही मतं यांच्यासारखीच कशी असतील ?

**पार्वती** : पण इथं या घरांत आल्यावर तुला इथल्यासारखं वागायलाच हवं. इथं तुझीं मतं आणि तुझ्या इच्छा काय कामाच्या ?

**लक्ष्मी** : माझं लग्न यांच्याशीं झालं आहे. मी यांना बांधलेली आहे. तुम्हीं यांचे आईबाप आहां, हा माझा अपराध नाहीं. तो त्यांचा अपराध. त्याची फळं ते भोगतील; मी कां म्हणून भोगीन ?

**शांता** : कुठं शिकलीस हें बोलायला ?

**लक्ष्मी** : तें शिकायला कॉलेजांत जावं लागत नाहीं. अनुभवानं हें शिक्षण मिळतं. तुमचंही लग्न व्हायचं आहे. दुसऱ्या घरांत गेल्यावर हें शिक्षण आपोआप मिळेल तुम्हांला. मला लग्नापूर्वी असं कधीं चुकून वाटलं नव्हतं. मी खूप उमेदी बाळगल्या होत्या. पण आज दोन वर्षांत त्यांचा चक्काचूर झाला आहे. या घरांतलं फर्निचर आणि मी यांत मला फारसा फरक वाटत नाहीं. मला स्वतःला कांहीं आवडी-निवडी असतील, इच्छा असतील, भावना असतील, असं तुम्हांला चुकून देखील कसं वाटत नाहीं ? फोटो काढायला जातांना मी काय नेसायचं तें देखील मी ठरवायचं नाहीं ? मग मीच कशाला यायला हवं ! चढवा कुणाच्या तरी अंगावर तो पोशाख आणि दागिने आणि बसवा तिला फोटोला.

**नाना** : हा फोटो कुटुंबांतल्या मंडळीचा आहे–धरूनबांधून आणलेल्या बाजारबुणग्यांचा नाहीं.

**लक्ष्मी** : मग जा तुम्हीं सारीं जणं. मी येत नाहीं.

**शांता** : वा; असं कसं होईल ?

**लक्ष्मी** : काय झालं त्यांत ? हा फोटो काय कुठं पाठवायचा आहे कुटुंबांत एकंदर किती माणसं आहेत तें दाखवायला ? 'फॅमिली–ग्रुप' म्हणजे कांहीं खानेसुमारी नव्हे.

**पार्वती** : अग, पण उद्यां हा फोटो इथं आम्हीं लावणार, चार येणारी–जाणारीं माणसं पाहाणार–तीं काय म्हणतील! आं–यांत सूनबाईचा फोटो कसा नाहीं?

**लक्ष्मी** : हा फोटो त्यांच्यासाठीं काढायचा आहे कीं काय?

**पार्वती** : तरीपण एवढ्या कुटुंबांत तूंच नसून कसं चालेल?–काय रे नारायण, बोल कीं तूं.

**नारा** : मी काय सांगूं? ती फोटोला यायला पहिल्यापासूनच तयार नव्हती.

**नाना** : कां?

**लक्ष्मी** : एवढ्यासाठींच, कीं ज्या कुटुंबांत ऐक्य नाहीं, सुख नाहीं आणि परस्परांबद्दलची मायाही नाहीं, त्या कुटुंबानं असा 'फॅमिली ग्रुप' काढून आपल्या आणि लोकांच्याही डोळ्यांत धूळ फेंकण्याचं कारण नाहीं. नऊ वारी भरजरी शालू नेसून आणि अंगावर टोपलीभर दागिने घालून तुमची सून म्हणून तुमच्याबरोबर फोटोंत माझं प्रदर्शन करायची मला मुळींसुद्धां इच्छा नाहीं. हा दिखाऊपणा मला नको आहे. मी या घरांत कुणीच नाहीं, ही जाणीव असतांना गौरीसारखी फोटोंत सजून बसायला माझी मुळींच तयारी नाहीं.

**नाना** : म्हणजे या घरांत काय तूं सत्ता गाजवायला पाहाते आहेस?

**लक्ष्मी** : सुनेला हक्कानं जेवढी सत्ता प्राप्त होते, तेवढीच सत्ता हवी आहे मला.

**नाना** : आम्हीं जिवंत असतांना? शक्य नाहीं. या घरांत असली सत्ता तुला आम्हीं जिवंत असेतोंपर्यंत मिळणं शक्य नाहीं.

**लक्ष्मी** : मग असल्या घरांत एक निर्जीव बाहुलं म्हणून राहाणं मलाही शक्य नाहीं. (सगळे चमकतात.)

**पार्वती** : म्हणजे!

**नारा** : अग, काय म्हणतेस तूं ?

**लक्ष्मी** : पुन्हां सांगते, तुम्हांला पाहिजे आहे तसं निर्जीव, परावलंबी होऊन या घरांत आयुष्य काढणं यापुढं मला अशक्य आहे.

**पार्वती** : म्हणजे कुठं जाणार तूं ?

**लक्ष्मी** : जगाच्या पाठीवर यांच्याबरोबर कुठंही संसार करीन.

**नाना** : म्हणजे नारायण—( नारायण कांहींतरी बोलण्याचा प्रयत्न करतो, पण त्याच्या तोंडून शब्द फुटत नाहीं. )

**शांता** : अय्या ! दादाही चालला ?

**पार्वती** : अरे नारायण—

**नाना** : नारायण या उंबरठ्याबाहेर पाऊल टाकणं या जन्मांत शक्य नाहीं.

**लक्ष्मी** : त्यांना माझ्याबरोबर यावं लागेल. माझ्याशीं त्यांची लग्नाची ब्रह्मगांठ बांधली गेली आहे, ती तुम्हीं कुणीही तोडूं शकणार नाहीं.—त्यांचीही तोडायची प्राज्ञा नाहीं. माझ्याशीं त्यांनी लग्न केलं आहे, तें या घरांत मी आजन्म परावलंबी सून म्हणून राहावं म्हणून नव्हे—मला स्वावलंबी पत्नी म्हणून जगायचं आहे. पत्नीचं हें स्वतंत्र जिणं मला त्यांनीं जगायला दिलंच पाहिजे. लग्न झालेल्या प्रत्येक स्त्रीचा हा हक्क आहे. आणि मी तो बजावल्याखेरीज राहाणार नाहीं. (झटक्यानें आंतल्या खोलींत निघून जाते.)

**नाना** : नारायण—लक्षांत ठेव, तूं आमचा मुलगा आहेस—या घराचा उंबरठाही तुला ओलांडतां येणार नाहीं—

**पार्वती** : तो काय जातो ? पंचवीस वर्षं माया लावली आहे त्याला आमची. ही काल—परवां घरांत आलेली.

**नाना** : काय वाटेल तें झालं तरी घर मोडूं देणार नाहीं मी. प्रत्येकजण असा सवता सुभा करायला लागला तर घराची शकलं

होऊन जातील. मनांत असो वा नसो—एकाच घरांत राहणारीं सारीं माणसं मरेपर्यंत तिथंच राहिलीं पाहिजेत. बदला ग कपडे. फोटो रद्द.

[ तावातावानें माडीवर निघून जातात. क्षणभरानें बाजीराव आणि त्याच्याबरोबर पंजाबी पोषाख केलेली त्याची वाग्दत्त वधु शोभा येते. ]

**बाजी** : चला, आम्हीं अगदीं वेळेवर आलों, नाहीं ?

**शांता** : हो–अगदीं वेळेवर आलास !

**पार्वती** : आणि ही कोण आणली आहेस बरोबर ?

**बाजी** : कोण वाटतं तुला ?–अग, सून होणार आहे तुझी ती सून. काय शोभा !

**शांता** : नांव काय म्हणालास ?–शोभा ?

**बाजी** : हं.

**शांता** : मला वाटलं मस्तानी असेल !

**बाजी** : काय म्हणालीस ? मस्तानी ? ( मोठमोठ्यानें हंसत शोभास ) शोभा, दे टाळी. ( दोघेही हंसतात. ) अग, मी हिला मस्तानीच म्हणतो.

**शांता** : हो–तूं बाजीराव—

**बाजी** : आणि ही मस्तानी. आई, पसंत पडली कीं नाहीं तुला ही सून ? अग, म्हटलं, आपला 'फॅमिली ग्रुप' निघायचा आज; तेव्हां हीही फोटोंत असलेली बरी. नाहींतर उद्यां लग्न झाल्यावर पुन्हां कोण 'फॅमिली-ग्रुप' काढायला बसला आहे ?

**पार्वती** : म्हणजे हे फोटोंत घालायचे का कपडे ?

**बाजी** : हो–छान दिसतील फोटोंत. काय ग शांता ?

**शांता** : हो तर ! तुझ्या वहिनीलाही दे मडमेचे कपडे आणून. ही पंजाबीण, ती मडम–आणि आम्हीं ह्या अशा !

**बाजी** : मोठा छान 'ग्रुप' होईल, नाहीं?–पण नाना कुठं आहेत? आणि दादा असा गप्प कां उभा? आणि वहिनी कुठं गेली? तिचे दागिने चढवून झाले नाहींत वाटतं अजून? चल म्हणावं लवकर. –पाहिलंस का शोभा आमचं घर? आतां तुझंही होणार आहे तें.

**शांता** : अगदीं लग्न झाल्यासारखा बोलतो आहेस!

**बाजी** : मग आतां काय व्हायचं राहिलंय? आज फोटो काढला, कीं तिच्यावर सून म्हणून स्टँप बसलाच!

**शांता** : फोटोचा बेत नानांनीं रद्द केला आहे.

**बाजी** : म्हणजे?

**शांता** : म्हणजे वहिनी फोटोसाठीं यायला तयार नाहीं. समजलं? जा हिला घेऊन आणलीस तशी.–चल ग आई.

[ पार्वतीबाईचा हात धरून तिला डाव्या बाजूच्या खोलींत ओढीत नेते. ]

**बाजी** : काय रे दादा, ही काय भानगड आहे?

**नारा** : मला विचारूं नकोस. ( उजवीकडच्या खोलींत निघून जातो. )

**बाजी** : अरेच्चा! कांहींतरी प्रचंड वादळ झालेलं दिसतं आहे घरांत! इतक्या वर्षांत आज खरं चैतन्य आलेलं दिसतं आहे मला या घरांत.

**शोभा** : म्हणजे?

**बाजी** : म्हणजे आज कुणीतरी बॉंब टाकला आहे घरावर–क्रांतीची आरोळी मारली आहे कुणीतरी–या घरांतलं साम्राज्य उलथून पाडलं आहे कुणी तरी! शोभा–शोभा–तुझा पायगुण तर चांगला ठरला! इतकीं वर्षं या घरांत चाललेली सत्ता उलथून पाडण्याचा जिनं पराक्रम केला त्या धैर्यशाली क्रांतिदेवतेचा आपण जयजयकार करूं!

**शोभा** : तो जयजयकार करण्यापूर्वी आतां फोटोचं काय ठरवायचं तें सांगा. एवढी तयारी केली ती फुकट जाईल ना!

**बाजी** : फुकट कशाला जाते! आपण दोघं जाऊं फोटो काढायला. पण थांब, मला जरा वहिनीला भेटूं दे.

**शोभा** : कशाला?

**बाजी** : आई आणि नानासारखे सासुसासरे आणि दादासारखा नवरा असतांना, तिनं या घरांत हें धैर्य कुठून आणलं, तें मला तिला विचारायलाच हवं! इंग्रजांबरोबर सामना देणारी झांशीची लक्ष्मी राणी आणि बापू गोखल्याला कासोटा संभाळ म्हणून सांगणारी ताई तेलिण आमच्या वहिनीपुढें कांहींच नव्हे, असं वाटायला लागलं आहे मला आज!

**शोभा** : म्हणजे आतां या घरांत राह्यला येण्यापूर्वी मलाही चांगली तयारी करूनच यायला हवं!

**बाजी** : ऊं:–तुला आणि मला नको त्याची काळजी. त्यांनीं जा म्हटलं तर आपली जायची तयारी आहेच. पण वहिनीचं तसं नाहीं. दादाला तिनं इथून ओढून न्यायचं ठरवलं तरी त्याचा आत्मा या घरांतच घोंटाळत राहील. नानानीं त्याला अगदीं कोकरूं करून टाकलं आहे. आईबापासाठीं बायको सोडील,–असला आहे तो!

**शोभा** : मला मिळायला हवा होता असा नवरा! कसा बायकोला सोडणार होता, पाहिलं असतं!

**बाजी** : छे : छे :–तुझ्यासारखी बायको मिळाल्यावर त्यानं आईबापालाच सोडलं असतं! आतां मीच पहा ना!–आतां मी ठरवलंय, नानांना वठणीवर आणायचं. जग किती पुढं गेलं आहे, याची त्यांना नीट कल्पना आणून द्यायची. मुलगा वयांत आल्यावर त्याच्यावर बापाच्या ऐटीनं सत्ता चालवूं पाहाण्यापेक्षां, त्याला बरोबरीचा मित्र समजल्यानेच कुटुंबांत सुख आणि शांतता नांदते–हें मी त्यांना पटवून देणार आहे. त्यांना पटलं तर ठीक–नाहीं तर त्यांना सांगणार, माझी उत्तर

दिशा, तुमची दक्षिण दिशा. तुम्हीं आणि तुमचं हें घर–खुशाल राहा आईला घेऊन.–मी चाललों माझ्या बायकोला घेऊन.

[ लक्ष्मी आणि नारायण हातांत बॅग व इतर सामान घेऊन येतात. नारायणाची मनःस्थिति केविलवाणी झाली आहे. मोठ्या परिश्रमानें तो एक एक पाऊल टाकतो आहे. ]

**बाजी** : आं–हें काय ? अरे, तुम्हीं कुठं चालला ?

**लक्ष्मी** : तुम्हां दोघांच्या हातीं या घरांतील आमची सत्ता देऊन !

**बाजी** : म्हणजे वहिनी, तूं इथून बाहेर निघालीस ? आणि नारायणालाही बरोबर घेऊन जाते आहेस ?–ब्राव्हो ! ब्राव्हो !

**नारा** : अरे, असा मोठ्यानं ओरडूं नकोस–नाना येतील.

**बाजी** : आतां एवढी सत्ता झुगारून घराबाहेर पडायला निघालास–आणि अजून नानांचं भय तुला वाटतंच आहे का ?

**लक्ष्मी** : एवढ्या वर्षांचे संस्कार एका क्षणांत कसे नाहींसे होतील ?

**बाजी** : अग, पण दादा नानांना आणि आईला सोडून ह्या घराबाहेर जायला तयार झालाच कसा ?

**लक्ष्मी** : ते तयार झाले नाहींत–मी त्यांना तयार केलं आहे. पत्नीचं संरक्षण पतीनं आधीं करायला हवं. आम्हीं चाललो, पण–तुम्हीं मात्र इथं आनंदांत राहा. शक्य तों कुणाला दुखवूं नका.–चला. ( नारायणासह जाते. )

**बाजी** : ( दरवाजांतून ) हिप हिप हुर्रे.

**शोभा** : हें काय ? मी आले आणि तुमची वहिनी गेली.

**बाजी** : सीतावनवास आहे हा ! फरक इतकाच, कीं पुराणांत रामाबरोबर सीता गेली आणि इथं सीतेनं रामाला खेंचून नेलं.

**शोभा** : मग आतां युवराज भरताचा काय विचार आहे ?

बाजी : राजा दशरथाला सामना द्यायचा ! (दोघेही हंसतात.)

बाजी : चल उतरूं रंगणांत संसाराच्या ।
सार्वभौम सत्ता ही नष्ट कराया ॥ ध्रु० ॥

शोभा : बादशहा तूं माझा ।
बाजी : तूं बेगम या घरची ।
शोभा : राहूं काय येथ गडे ! मांडलिक होउनी ॥
बाजी : नको ! नको ! नको ! नको ! ॥ १ ॥

बाजी : जरि घडला मानभंग ।
शोभा : करशील तूं काय सांग ।
बाजी : त्याक्षणींच धिःकारुनी जाऊं राज्य सोडुनी ।
आणि राहूं इतिहासीं अजरामर होउनी ।
शोभा : पहा । पहा । पहा । पहा ॥ २ ॥

शोभा : जाऊं दूर रानींवनीं अथवा गिरिकंदरीं ।
बाजी : प्रेमबलें आणूं चल नंदनवन भूवरी ॥ ३ ॥

---

# अंक २ रा

[ स्थळ तेंच. बहुतेक सर्व वस्तु पूर्वींच्याच आहेत. मधल्या राउंड टेबलावर एक मोठं फ्लॉअरपॉट आणि भिंतीवर एक दोन नवीन प्रेक्षणीय चित्रें एवढीच भर आतां पडली आहे. आणि ती पडणें साहजिकच आहे. कारण, नाइलाजानें का होईना, पण नाना आणि पार्वतीबाई यांनी बाजीरावाला शोभेशीं लग्न करण्यास संमती दिल्यामुळें ती या घरांत आली आहे. आणि तिच्या तेथील अस्तित्वाचेंच हें चिन्ह आहे.

संध्याकाळ झाली आहे. नाना आणि पार्वती अस्वस्थ चित्तानें परस्पर विरुद्ध दिशेनें फेऱ्या मारीत आहेत. दोघांची भेट झाली म्हणजे त्यांच्या तोंडांतून उद्गार बाहेर पडत आहेत आणि पुन्हां ते आपापल्या दिशेनें जात आहेत. ]

**नाना** : हाही कार्टा असा निघेल, अशी कल्पना नव्हती.

**पार्वती** : नव्हती कशाला? त्याचीच लक्षणं पहिल्यापासून तशीं दिसत होतीं. नारायण बिचारा गोगलगाय होता.

**नाना** : काय दुर्बुद्धि झाली मला आणि मी तिच्याशीं लग्न कर म्हटलं त्याला.

**पार्वती** : आणि तुम्ही नको म्हटलं असतं म्हणून तो थोडाच थांबणार होता.

**नाना** : हो–गेला असता हाही घरांतून निघून !—

**पार्वती** : तेंही पत्करलं असतं एकवेळ !

**नाना** : मुळींच पत्करलं नसतं मला. म्हणून तर मनांत नसतांना त्याला परवानगी दिली.

**पार्वती** : त्यांचे चाळे बघायलाच घरांत रहायचं आतां आम्हीं. अगदीं ताळ सोडला आहे दोघांनीं !

**नाना** : तरुण–तरुण म्हणून तरी किती काणाडोळा करायचा? आम्हीही होतोंच एकेकाळीं तरुण !

**पार्वती :** आपली गोष्ट कशाला ? लग्नानंतर दहा वर्षं झाली तरी कुणाच्या पुढ्यांत आपण एकमेकाशीं बोलत नव्हतों.

**नाना :** आणि हीं दोघं एका कोचावर खुशाल एकमेकाला खेटून बसतात आमच्या पुढ्यांत.

**पार्वती :** तेवढ्यानंच काय झालं आहे ?–परवा मी देवळांतून येते तर हीं दोघं इथं–नको बाई !–तोंडांतून शब्द काढायला देखील लाज वाटते. कधीं लग्न झाल्यापासून वागलों नाहीं आपण असे !

**नाना :** एकदा चांगलं झाडावं म्हटलं, तर तेवढ्याच निमित्तानं जाईल निघून घरांतून.

**पार्वती :** मग काय जन्मभर त्यांचे हे थेर बघतच राहायचं आम्ही ?

**नाना :** काय आतां थोडीं वर्षं राहिलीं आहेत आपलीं.

**पार्वती :** पण आतां एक दिवस देखील त्यांचे हे चाळे बघायला तयार नाहीं मी. माझी शांता आणखी चळायची त्यांचे हे थेर बघून.

**नाना :** हो–ती भिती आहेच आणखी.

**पार्वती :** तें कांहीं नाहीं–आज बाजीरावाचे चांगले कान पिळा. मी त्या सटवीची पूजा करते चांगली.

**नाना :** आणि दोघंही निघून गेली म्हणजे ?–छेः छेः, नको. तो नारायण आणि लक्ष्मी निघून गेलीं आहेत त्यानंच मी केवढा तरी खचून गेलों आहे आधीं; त्यांत हा आणखी धक्का नको मनाला. जन्माची सगळी तपश्चर्या फुकट गेली, असं व्हायला नको.

**पार्वती :** ह्या मनस्तापापेक्षां कांहीं त्याचा मनस्ताप जास्त नाहीं.

**नाना :** छे : छेः–चार लोकांना हें प्रदर्शन नको दाखवायला. एवढंसं वीतभर घर आम्हांला शाबूत ठेवतां येत नाहीं–लाज वाटायला हवी आम्हांला. एका घरांत तीन पक्ष व्हायला लागले तर चालायचं

कसं ? छे: छे:–एका लहानशा कुटुंबांत देखील एकी नांदवतां येत नाहीं आम्हांला–आणि म्हणे आम्हांला स्वराज्य पाहिजे !

**पार्वती :** मी बाईमाणूस–मला नाहीं समजत तुमचं हें एकी-बेकीचं प्रकरण ! पण आतां यापुढं माझ्या डोळ्यांना त्यांचं हें वेडंवांकडं वागणं दिसलं, तर साफ सांगणार आहें मी बाजीरावाला आणि त्या सटवीला, कीं आमच्या डोळ्यापुढें हे तुमचे थेर नकोत. माझी शांता आणखी हें सारं पाहून बिघडली, तर कुत्रा हाल खाणार नाहीं आमचे. कॉलेजांत जाते तरी कशी जपून ठेवली आहे तिला अजून. तिला आणखी ही कीड लागायला नको. हो–नासक्या फळांशेजारीं राहून चांगली फळं देखील कुजायची !

[ बोलत बोलत आंत जाते. नाना विचारमग्न मनःस्थितींत एकटेच फेऱ्या मारीत राहतात व नंतर माडीवर जातात.

थोड्या वेळानें शांता आणि तिच्याबरोबर साहेबी पोषाखांत, तोंडांत 'पाइप' व खाकेंत एक लठ्ठ पुस्तक घेतलेला एक इसम येतो. त्याचें नांव प्रो. शहाणे. तो थोडाफार बहिरा आहे आणि आपली हाडकुळी छाती पुढें काढून चालण्याची त्याला संवय आहे. आणखीही त्याच्या इतर संवई आहेत–पण त्या रंगभूमीवर प्रेक्षकांना पाहतां येतील. प्रथम शांता आंत पाऊल टाकते व भयभित मुद्रेनें पाहाते. तेथें कोणी नाहीं असें पाहून, प्रो. शहाण्यांना खुणावते. शांता आणि प्रो. शहाणे दोघेंही आंत येतात. ]

**प्रो. शहाणे** : ( सभोंवार पाहात ) हं–हें तुझं घर.

**शांता** : ( प्रेमानें त्यांच्याकडे पाहात ) आतां माझंच एकटीचं नव्हे सर—

**प्रो. शहाणे :** ओः–आय मीन–आपलं घर.–पण काय ग शांता, तुझ्या आईवडलांना धक्का तर बसणार नाहीं आपण लग्न करणार हें ऐकून ?

**शांता :** एरव्हीं बसला असता; पण आपण इथंच राहणार आहों, तेव्हां त्यांना त्यांतल्या त्यांत बरं वाटेल. आमच्या नानांना घरांतलीं

माणसं फुटून बाहेर गेलेली मुळींच खपत नाहीं. दादा आणि वहिनी घरांतून जाऊन निराळं बिऱ्हाड करून राहिलीं आहेत, तर नाना किती अवस्थ झाले! एवढ्याशा घरांत चार माणसं एकत्र नांदू शकत नाहींत, तर नाना जाति आणि नाना धर्म असलेल्या आपल्या हिंदुस्थानांत सारे जण एकोप्यानें कसे राहाणार-असं ते नेहमीं म्हणतात.

**प्रो. शहाणे** : गुड-गुड-ह्या विचाराचीं माणसं कांहीं थोडीथोडकीं नाहींत. पण मिस परांजपे—

**शांता** : ( मान हालवीत ) उहुं—

**प्रो. शहाणे** : ओः-आय मीन मिसेस शहाणे, तुम्ही जर देशांतल्या राजकारणाचा मननपूर्वक अभ्यास केलात, तर तुम्हांला असं दिसून येईल, कीं तुमच्या वडिलांच्या विचाराची जशी अनेक माणसं देशांत आहेत तशींच त्याविरुद्ध विचाराची माणसं देखील फार आहेत. परस्परांत मतभेद असतांना, ऐक्याच्या खोट्या कल्पनेनं त्यांना एकत्र आणून त्यांच्यामधील असंतोषाची वाढ करण्यापेक्षा, सवते सुभे करून सर्वांना आपापल्या मतांप्रमाणें राहूं दिल्यानंच देशांत जास्त सौख्य नांदेल, असं अनेक पुढाऱ्यांचं म्हणणं आहे.

**शांता** : ( व्याख्यानाच्या पाविञ्यांत ) त्या पुढाऱ्यांची सध्यां आपल्याला मुलाखत घ्यायची नसून, माझ्या आईबापांशीं मिस्टर आणि मिसेस शहाणे यांना सामना द्यायचा आहे, हें मी प्रो. शहाण्यांच्या नजरेस आणूं इच्छितें.

**प्रो. शहाणे** : ओः-सॉरी. पण तुझी आई, वडिल आहेत कुठं ?

**शांता** : मी तुमची ओळख करून देते सर, त्यांच्याशीं पण हें पहा, प्रथम आमच्या कॉलेजांतले प्रोफेसर म्हणून मी त्यांना सांगेन हं.

**प्रो. शहाणे** : पण केव्हातरी त्यांना खरी गोष्ट सांगायलाच हवी.

**शांता** : ती तुम्हीं सांगा. मी आजपर्यंत अशा मनोवृत्तींत या घरांत वाढलें आहे, कीं मी तुमच्याशीं लग्न करणार आहे, हें सांगायला माझ्या तोंडून शब्दच फुटायचा नाहीं.

**प्रो. शहाणे** : मग मी काय त्यांच्यापाशीं तुला मागणी घालूं ?

**शांता** : हो–पण लग्न करून आपण इथंच राहणार आहों, हें सांगायला विसरूं नका. कारण मीही घरांतून जाईन, या भितीनं ते एकदम नकार देतील. दादा गेला–आतां बाजीरावालाही ते घरांतून आपण होऊन हांकलतील, असं वाटायला लागलं आहे.

**प्रो. शहाणे** : कां बुवा ?

**शांता** : तो आणि त्याची बायको अगदीं जुमानत नाहींत घरांत त्यांना. वाटेल तो धुमाकुळ घालीत असतात नानांच्या आणि आईच्या पुढ्यांत.

**प्रो. शहाणे** : आपण कांहीं तसा धुमाकुळ घालणार नाहीं–नाहीं ?

**शांता** : छे:.

**प्रो. शहाणे** : तुला स्वत:बद्दल खात्री आहे एवढी ?

**शांता** : हो.

**प्रो शहाणे** : मला शंका वाटते.

**शांता** : माझ्याबद्दल ?

**प्रो. शहाणे** : हो.

**शांता** : कां ?

**प्रो. शहाणे** : पुरुषापेक्षां बायका जास्त विकारवश असतात, असा निसर्गाचा नियम आहे.

**शांता** : पण तशी मी नाहीं.–येईलच तुम्हांला अनुभव. एखाद वेळीं तुम्हीं लाडांत याल–पण मी येणार नाहीं. घरांत शिक्षणच मिळालं आहे आम्हांला तसं.

**प्रो. शहाणे :** पण तुझा तो भाऊ–बाजीराव कीं कोण तो–अगदीं धुमाकुळ घालतो बायकोबरोबर म्हणालीस तूं ?

**शांता :** हो–पुरुष पडला तो. तसं आम्हां बायकांचं नाहीं कांहीं.

**प्रो. शहाणे :** मानसशास्त्राप्रमाणं विचार करायचा तर, इतकीं वर्षं तारुण्याच्या साऱ्या भावना दाबून ठेवल्या असल्यामुळें त्या आतां दुप्पट जोरानं वर उसळून यायला हव्यात !

**शांता :** तुम्ही नका काळजी करूं त्याची, सर. तुम्ही मात्र इथं इतर पुरुषासारखे वागूं नका म्हणजे झालं.

**प्रो. शहाणे :** काय सांगावं ? दुसरं लग्न केलं, कीं पुरुष जास्त बावचळतो म्हणतात.–आणि तशांत मी पडलों प्रोफेसर.

**शांता :** प्रोफेसरांनी अगदी लाज सोडलीच पाहिजे वाटतं ?

**प्रो. शहाणे :** ओ: नो–नो–नो. तसा कांहीं नियम नाहीं. पण आतांपर्यंत दुसरं लग्न केलेल्या प्रोफेसरांनीं आपलं नांव भारी बहु करून टाकलं आहे, म्हणून जरा खात्री वाटत नाहीं स्वत:बद्दल.

[ दुरून बाजीराव आणि शोभा यांच्या हंसण्याचा आवाज येतो. ]

**शांता :** आला वाटतं बाजीराव ?

[ दरवाजांतून बघून परत येते. बाजीराव व शोभा हातांत हात घालून हंसत खिदळत येतात. ]

**बाजी :** शांता, तुलाही नेलं पाहिजे होतं आजचं पिक्चर पाहायला. थोडं शिकली असतीस तरी प्रेम करायला !

**शांता :** कांहीं नको शिकायला मला.

**बाजी :** का–यायला लागलं कीं काय तुला प्रेम करायला ? ( प्रो. शहाणेकडे नजर जाऊन ) ओ:–हे कोण ?

**शांता :** प्रोफेसर आहेत आमच्या कॉलेजांत.

**शोभा :** कॉलेज समजून चुकून इथं आले वाटतं ?

**प्रो. शहाणे** : मी चुकून आलों नाहीं–मुद्दामच आलों आहे.

**बाजी** : कां हो ?

**शांता** : घरीं आलेल्या पाहुण्याला असा प्रश्न विचारणं सभ्यपणाचं नाहीं, बाजी.

**बाजी** : ओः–पाहुणे आहेत होय? मग हरकत नाहीं. म्हटलं मुद्दामच आले तेव्हां–आपलं नांव ?

**शांता** : प्रो. शहाणे.

**बाजी** : नांव चांगलं आहे–अर्थपूर्ण आहे. माझं नांव बाजीराव.

**प्रो. शहाणे** : पहिले कीं दुसरे ?

**बाजी** : तिसरे ! कारण त्या दोघाही बाजीरावांना इतकी चांगली बायको मिळाली नव्हती ! ही मिसेस बाजीराव. आपण एकटेच आलात ?

**प्रो. शहाणे** : ह्या तुमच्या बहिणीबरोबर आलों—एकटा नाहीं आलों.

**बाजी** : छे: छे:, तसं नव्हे–म्हणजे तुमच्या मिसेसनां घेऊन नाहीं आला ?

**शोभा** : वाः–तुमचं आपलं कांहीं तरीच ! आपल्या विद्यार्थिनीच्या घरीं जायचं तें काय आपल्या बायकोला घेऊन ?

**बाजी** : हो–खरंच–तिच्याकडे चोरूनच जावं लागतं, नाहीं का ? ( प्रो. शहाणे नर्व्हस होऊन तोंडांत 'पाइप' कोंबतात. ) त्या 'पाइप' मध्यें तंबाखू नाहीं वाटतं ?

**शांता** : तुला काय करायचं आहे असला आणि नसला तरी ?

**शोभा** : हो–खरंच. तुम्हांला काय करायचं आहे हो ? ज्याचं ते पाहून घेतील. ( दोघेही हंसतात. )

**शांता** : समजतात बरं मला तुमचीं बोलणीं ! मला अगदीच ही समजूं नकोस.

**बाजी :** छे: छेः—असं कसं समजूं आम्हीं?

**शांता :** ( प्रो. शहाणेस ) चला हो—आपण माडीवर जाऊं.

**शोभा :** ( दचकून ) आं?

**शांता :** नाना आहेत म्हटलं वर.

**बाजी :** मग हरकत नाहीं.

**शांता :** आणि नसते म्हणून एवढा कांहीं आमच्याबद्दल संशय घ्यायला नको.

**शोभा :** हो—हे प्रोफेसर आणि ह्या विद्यार्थिनी! संशयाला जागाच नाहीं!

**बाजी :** हो—संशयाला जागाच नाहीं!

**शांता :** ( चिडून ) चला तुम्हीं.

[ प्रो. शहाणे त्यांच्याकडे रागानें पहात शांताबरोबर माडीवर निघून जातात. बाजीराव आणि शोभा मनसोक्त हंसतात. ]

**शोभा :** मी नक्की सांगतें—तुमची बहिण अखेर माणसांत आली!

**बाजी :** इतके दिवस आपल्या सहवासांत असल्यावर काय बिशाद होती तिची सोवळं राहायची? अग, आपलं पाहून नानांना देखील आईबद्दल अलिकडे फार प्रेम वाटायला लागलं असेल!

( दोघेही हंसतात. )

**शोभा :** पण शांतानं इतकी वर्षं थांबून अखेर हा प्रोफेसरच काय पाहिला?

**बाजी :** अग, वेळ निघून गेली म्हणजे ह्या वाढलेल्या पोरी वैतागून अखेर वाटेल त्याच्या गळ्यांत पडतात. सुरवातीला सगळ्या तरुणांना नाकं मुरडायचीं आणि मग शेवटीं कुठला तरी जरखड, बाळवट पुरुष बघायचा, हें ठरूनच गेलं आहे ह्या पोरींचं! नगाला नग मिळाला म्हणजे झालं—असं अखेर त्यांचं तत्त्वज्ञान व्हायला लागतं!

**शोभा :** आणि तशांत हा प्रोफेसर! अगदींच बावळट दिसतो!

**बाजी :** मग प्रोफेसर आणखी कसा दिसायचा? शंभर माणसांत प्रोफेसर ओळखून काढावा!

**शोभा :** तुमच्या नानापुढं मात्र पुन्हां प्रश्न उभा राहील. मोठा मुलगा गेला—मुलगीही जायला निघाली—घर मोडायला लागलं, असं वाटायचं त्यांना.

**बाजी :** पण त्यासाठीं ते शांताच्या लग्नाआड यायला लागले, तर आपण मात्र तिला मदत करणार! भलत्या समजुतीनं तिच्या आयुष्याचा नाश करायचा म्हणजे काय? इतकीं वर्षं तिला घरांत तशीच बसवून ठेवली ती ठेवली, आणि आतां तिनं स्वत: आपला नवरा पाहिला, तर तिला तर लग्न नको करूं म्हणायचं म्हणजे राक्षसीपणाच होईल.

**शोभा :** पण नानानीं नाहीं म्हटलं, म्हणून शांता गप्प राहील, असं नाहीं वाटत मला. तुमचा दादाच पाहा ना! आपल्या बायकोबरोबर तो जाईल, असं तुम्हाला तरी वाटलं होतं का?

**बाजी :** नाहीं बुवा. त्याच्या आयुष्यांत त्यानं ही 'बाउंडरी' मारली आहे. तरी पण मला अजून त्याची खात्री वाटत नाहीं.

**शोभा :** म्हणजे?

**बाजी :** तो केव्हां ना केव्हां इथं परत आल्याशिवाय राहायचा नाहीं.

**शोभा :** बायकोला सोडून?

**बाजी :** त्याचा काय नेम? नानांनी त्याला इतका कांहीं आपलासा करून टाकला आहे, कीं एखादं माणसाळलेलं जनावर देखील त्याच्यापेक्षां जास्त स्वतंत्र वृत्तीचं असेल.

**शोभा :** मग तो गेला कसा नानांना सोडून?

**बाजी :** वहिनीमुळं. तिनं हात धरून त्याला खेंचून नेला. ती बाणेदार होती म्हणून त्याचं कांहीं चालेना. आणि दादासारखी माणसं

असतात, त्यांना कोणीतरी आपल्यावर अधिकार गाजवावा, असंच आयुष्यभर वाटत असतं. नाना नाहीं तर वहिनी! पण वहिनीपेक्षां नानांचंच वर्चस्व त्याच्या मनावर फार आहे. म्हणून मी म्हणतो, तो एखाद दिवशीं दत्त म्हणून इथं येऊन उभा राहायचा.

**शोभा** : पण तुमची वहिनी परत येईल असं वाटतं तुम्हांला?

**बाजी** : छे:. वहिनीसारखं किंवा तुझ्यासारखं बाहेरून येणारं माणूस इथं येतं तें कांहीं तरी मनाशीं आपल्या संसाराच्या अपेक्षा करून. आणि इथं सर्कशींतल्या जनावरासारखं रिंगमास्तराच्या हाताखालीं ठराविक आयुष्य काढायचा प्रसंग आला, तर त्याचा अखेर वीट येणारच. नानांना अजून कळत नाहीं—पण एकदा मी त्यांना सांगणार आहे—

**शोभा** : त्यापूर्वी मला सांगून ठेवा. म्हणजे आपलं सारं सामान बांधून ठेवायला बरं!

**बाजी** : लग्नापूर्वीच आपण त्याची तयारी करून ठेवली आहे. इतके दिवस आपण काढले ते देखील काढले नसते. पण ही दादाची आणि वहिनीची मेहेरबानी समज. दादा निघून गेला, म्हणून मला अजून नानांनीं घरांत ठेवला आहे. मी कसाही बरावाईट असलों, तरी त्यांना आपल्या इभ्रतीसाठीं मला घरांत ठेवणं भागच आहे.— मी जाणून आहे हें सारं.

**शोभा** : हो—आपण एकमेकाशीं हंसतो-खिदळतो, बाहेर फिरायला जातो—हें त्यांना मुळींच आवडत नाहीं, हें आलं आहे माझ्या लक्षांत. पण इतकंही स्वातंत्र्य द्यायचं नाहीं, तर लग्न करायचं कशाला?

**बाजी** : त्यांना सुना हव्या म्हणून;—आम्हांला बायका पाहिजेत म्हणून नव्हे!

[ आपला कोट, हॅट, टाय वगैरे घेऊन तो आंतल्या खोलींत जातो. शोभा गाते. ]

**शोभा :**

**रमल्या या नवबाला ॥ प्रेमळ, मंगल या संसारीं ।**
**उभवुनि प्रेमाच्या प्रासादा ॥ धृ. ॥**
**पतिसहवासीं फुलती आशा । नवसंसाराच्या ।**
**प्रफुल्ल हृदयीं । सुफलित गणुनी सौभाग्याला ॥ १ ॥**

तिचें गाणें संपण्याच्या सुमारास शांता व तिच्या मागोमाग प्रो. शहाणे माडीवरून येतात. शांताचा अप्रसन्न चेहरा पाहून शोभा तिच्याजवळ येते. ]

**शोभा :** काय म्हणाले नाना ?

**शांता :** तुला काय करायचं आहे ?—( प्रो. शहाणेस ) जा सर, तुम्हीं· I am very sorry.

**प्रो· शहाणे :** जाऊं ?

**शांता :** मग काय करणार ? नाना नकार देणार असं वाटलंच होतं मला.

**शोभा :** कां दिला नकार ?

**शांता :** तुला काय करायचं आहे ? ( प्रो. शहाणेस ) तुमची पहिली बायको जिवंत असली म्हणून काय झालं ? दोन लग्नं काय करीत नाहींत कुणी या दिवसांत ?

**शोभा :** अस्सं–म्हणजे यांची पहिली बायको जिवंत असतांना तुम्ही यांच्याशीं पुन्हा लग्न करणार होतां ?

**प्रो. शहाणे :** मग आतां काय हिला या वयांत पहिलेपणाचा नवरा मिळणार आहे ?

**शोभा :** इतकी वर्षं उगीच थांबलांत !

**शांता :** तुझं काय जातं ?

**शोभा :** छे:–माझं कांहीं जात नाहीं. पण–पण आतां लग्नाशिवाय किती वर्षं रहाणार ?

**प्रो. शहाणे** : हो–मीहि तेंच म्हणतों. बायकांनीं लग्नाशिवाय राहाणं बरं नाहीं.

**शोभा** : हो–लोकांना संशय यायला लागतो, हिचं लग्न कां होत नाहीं ?

**शांता** : इतकं कांहीं वय गेलं नाहीं माझं अजून !

**शोभा** : जाईल आणखी थोड्या वर्षांनीं ! त्यापेक्षां मी म्हणते–असेना का दुसरेपणाचा–करून टाका तुम्हीं यांच्याशीं लग्न.

**शांता** : हो–तुझं काय जातं म्हणायला !–म्हणे करून टाका लग्न. लग्न करणं ही वाटते तितकी सोपी गोष्ट नव्हे.

**शोभा** : हात्तिच्या ! लग्न करण्यासारखी सोपी गोष्ट नाहीं जगांत. काय हो प्रोफेसर ?–यांचंच पहा ना. एक बायको असतांना दुसरी बायको करायला हे निघाले, ते लग्न करणं ही इतकी सोपी गोष्ट आहे म्हणूनच कीं नाहीं ? उगीच तुम्हांला तुमच्या नानांचं भय वाटतं. एकदां तुम्हीं लग्न लावून टाकल्यावर काय करणार आहेत ते ?

**शांता** : म्हणजे काय गुपचूप लग्न लावूं यांच्याशीं ?

**शोभा** : मग काय सिनेमासारखी वर्तमानपत्रांत पानभर जाहिरात देऊन लग्न करणार आहां ? अशीं लग्नं गुपचुपच उरकायचीं असतात !

**शांता** : नाना आकाश–पाताळ एक करतील.

**शोभा** : आणि मग थकून गप्प बसतील !–म्हाताऱ्या माणसांचं असंच असतं.

**शांता** : माझ्यावर त्यांचा केवढा विश्वास !

**शोभा** : शेक्सपीयरचीं नाटकं वाचलीं नाहींत वाटतं त्यांनीं ? तो स्त्रीजातीबद्दल काय म्हणतो तें एकदां त्यांना कळायलाच हवं ! तुमच्या दादाबद्दल काय त्यांना कमी विश्वास वाटत होता ! पण तो पुरुषासारखा पुरुष असूनही त्यानं नानांचा विश्वासघात केला ! मग तुम्हीं तर काय–स्त्री ! विश्वासघात करण्याचा तुम्हांला परवानाच आहे !

**शांता** : नानापुढं हें पांडित्य वांया जाईल तुझं.

**शोभा** : काय करूं ? ते कधीं माझ्याशीं बोलतच नाहींत. वास्तविक सून म्हणून त्यांनीं माझं किती कौतुक करायला हवं !

**शांता** : कौतुक ! अजून इतके दिवस त्यांनीं तुम्हां दोघांना घरांत राहूं कसं दिलं आहे, याचंच मला राहून राहून आश्चर्य वाटतं आहे !

**प्रो. शहाणे** : हो–फार धुमाकूळ घालतां म्हणे तुम्ही !

**शोभा** : पण काय हो प्रोफेसर, या वयांत आम्हीं धुमाकूळ घालायचा नाहीं तर काय नानांनीं ? आणि धुमाकूळ म्हणजे तरी काय ? नवऱ्याशीं हंसत–खेळत बोलणं–उठणं–बसणं हेंच ना ? नवऱ्याशीं असं मोकळेपणानं वागायचं नाहीं तर काय आम्हीं बायकांनीं दुसऱ्या पुरुषाशीं असं वागायचं ? मग नवरा आणून देतात कशाला आम्हांला ?

**शांता** : पण त्यांच्या पुढ्यांत देखील तूं आणि बाजीराव असेच वागतां !

**शोभा** : मग त्यावेळीं काय वैरी समजून आम्हीं एकमेकाचं तोंड पाहायचं नाहीं !–मला वाटतं, ह्या म्हाताऱ्या माणसांना आम्हां तरुणांच्या ह्या सुखाचा हेवा वाटत असतो–म्हणून त्यांना तें बघवत नाहीं. आणि मग आमच्यावरच अमर्यादपणाचा आरोप करायला लागतात !

**शांता** : विचार नानांना एकदा !

**शोभा** : मग घाबरेन कीं काय ? त्यांच्या शिस्तींत लहानाची मोठी झालेली दुबळी मुलगी नाहीं मी त्यांची ! सून आहे बाहेरून आणलेली ! तुम्हींच हा भित्रेपणा दाखवावा. मी असते तुमच्या जागीं, तर नानांना नुसतं 'येते हं यांच्याशीं लग्न करून' एवढंच सांगून बाहेर पडले असते यांच्याबरोबर !

**प्रो. शहाणे** : होय ?

**शोभा** : म्हणजे तुमच्याबरोबर समजूं नका हं ! असा सेकंड–हॅंड नवरा मला मुळींच चालला नसता ! कारण तशी पाळी येईपर्यंत मी लग्न करायची थांबलेच नसते !

**शांता :** आणि मी तरी काय खुषीनं थांबलें इतकी वर्षं ? नाना मला स्थळच पाहिनात !

**शोभा :** आपलं लग्न आपल्या आईबापानीं जमवायचं, हीच विचारसरणी मुळीं चुकीची आहे. जेवत नाहीं तुम्हीं आपल्या हातांनी ? आणि लग्न मात्र दुसऱ्याच्या हातून झालं पाहिजे ! आपलं लग्न आपण नको करायला ? नाना नाहीं म्हणतात, म्हणून हा हातचा नवरा घालवणार कीं काय तुम्हीं ?

**प्रो. शहाणे :** हो–मी तेंच म्हणतों.

**शोभा :** आतां तुमची निवड कांहीं फारशी चांगली आहे असं नाहीं—पण—

**प्रो. शहाणे :** अपमान आहे हा माझा. मी नालायक असतो तर माझं पहिलं लग्न देखील झालं नसतं.

**शोभा :** म्हणजे तुमचं पहिलं लग्न हें तुमच्या लायकीचं सर्टिफिकेट वाटतं ?

**प्रो. शहाणे :** अलबत.

**शोभा :** लग्न व्हायला लायकी लागते असं कुठल्या पुस्तकांत वाचलं तुम्हीं ? लग्नाइतकी सोपी गोष्ट नाहीं जगांत–मघांच सांगितलं मी. लग्न होण्यापासून स्वतःचा बचाव करणं, हेंच आतां खऱ्या लायकीचं लक्षण समजण्यांत आलं पाहिजे ! तुम्हीं झटपट लग्न उरकून घ्या.

**पार्वती :** (येत)—शांता—ए शांता—अग, केव्हांपासून हांका मारते आहे मी तुला आंतून ? तुझा आवाज मी ऐकला, आणि तुला नाहीं का माझी हांक ऐकूं आली ? जरा भाजी निवडून घ्यायला सांगत होते तुला, तर—

**शोभा :** मी येते ना !

**पार्वती :** तूं ?—छे—तूं राजाची राणी, तूं हात लावायचा का कशाला ?

**शोभा** : आतां यापुढं मलाच करावं लागणार तुमच्या हाताखालीं. तुमच्या मुलीचं म्हणे लग्न ठरलंय्.

**पार्वती** : कुणाचं ?—शांताचं ?—काय ग, काय ऐकते आहे मी हें ?

**शोभा** : हे प्रोफेसर शहाणे—

**पार्वती** : आं ?—शांता, अग, काय आहे हें ? तोंड तरी उघड.

**शोभा** : वा—त्या काय सांगणार ? लाजायला नको का त्यांना ? नाहीं तर पुन्हां आणखी निर्लज्ज म्हणाल आमच्यासारखं.

**पार्वती** : तुमची सर कुणालाच यायची नाहीं. तो कुठं गेला बाजीरावचा बेटा ?

**शोभा** : बेटा कुठं आहे माहित नाहीं अजून !—पण बाजीराव मात्र आंत आहेत. आणतें हं बोलावून. ( आंतल्या खोलींत जाते. )

**शांता** : आई—

**पार्वती** : काय ग आहे हा प्रकार ?

**शांता** : आई, आतां मी आणखी किती वर्षं थांबू ? माझं लग्न नको का व्हायला ?

**पार्वती** : अगदीं उघडउघड विचारतेस ! लाज अगदीं कोळून प्यालीस कीं काय ? तरी मी म्हणत होतें-ह्या पोराला आणि त्या सटवीला घरांत ठेवूं नका. त्यांचे चाळे बघून तूं बिघडशील !

**शांता** : बिघडले नाहीं ग—

**पार्वती** : नाहीं काय-बिघडलीसच म्हणते मी ! अगदीं उघडउघड विचारतेस आणखी किती थांबू म्हणून ? लाज नाहीं वाटत तुला ?

**शांता** : ती वाटूनच इतकी वर्षं गप्प राहिलें. म्हटलं, तूं, नाना—माझ्या लग्नाची कुठं खटपट कराल. पण तुम्हीं चुकून कधीं ब्र काढीत नाहीं माझ्या लग्नाबद्दल-मग मी काय करूं ?

**पार्वती :** म्हणून तूंच त्या बाजीरावासारखं परस्पर जमवलंस ? आण तरी त्याला माझ्यासमोर !—

**शांता :** हे—हे प्रोफेसर आहेत आमच्या कॉलेजांत.

**पार्वती :** मला काय करायचं आहे त्यांच्याशीं ? मी विचारते आहे तुला—

**शांता :** हो—तेच हे.

**पार्वती :** हो का ?—मग अगोदर कां नाहीं सांगितलंस ? चहा नाहीं का द्यायचा त्यांना ?

**शांता :** ( हर्षानें ) हो तर. करूं का ?

**पार्वती :** अग, विचारतेस काय ?

**शांता :** आत्तां आणते करून. तोंपर्यंत सर—( प्रो. शहाणे यांना खुणवते व जाते. )

**प्रो. शहाणे :** मला वाटलं होतं—तुम्हीं आपल्या मुलीला टाकून बोलाल !

**पार्वती :** कशाबद्दल ? लग्न जमवल्याबद्दल ?—छेः हो सर ! आईला का मुलीबद्दल कधीं असं वाटतं ? तिच्या अंगाला हळद लागलेली पाहून माझ्या डोळ्याचं पारणं फिटेल.

**प्रो. शहाणे :** तुमच्या या शब्दांनीं मला कितीतरी हुरुप आला आहे.

**पार्वती :** अहो सर, मुलीनं परस्पर लग्न जमवलं तरी नवरा चांगला बघितला म्हणजे झालं. तुम्हीं प्रोफेसर कीं काय ते आहांत ना ? म्हणजे चांगलेच आहां. कुणी उपटसुंभ नाहीं कांहीं.—आतां यांना सांगायला हवं. सध्यां किनई सर, आमच्या इथं मुळींच कसं तें मन ठिकाणावर नाहीं.

**प्रो. शहाणे :** हो—तुमच्या मुलीनं मला सांगितलं आहे सारं. तुमची मोठी सून—

**पार्वती** : तिचं नांव काढूं नका. भरल्या घरांतून निघून गेली ती! आणि गेली ती गेली—आमच्या नारायणालाही कीं हो घेऊन गेली सर!

**प्रो. शहाणे** : पण नारायणराव कसे गेले?

**पार्वती** : अगदीं बायल्याच तो! नाहीं तरी हल्लीचीं मुलं अशींच बायकोच्या मागेंमागें करणारीं. आमचं नाहीं का लग्न झालं? पण हे कधीं असं वागल्याचं आठवत नाहीं.-शांताला मात्र नीट संभाळा. मी इकडची काडी तिकडे करूं दिली नाहीं तिला कधीं इतक्या वर्षांत. अगदीं गरीब आहे पोर. नाहीं तर आमच्या घरांत आलेलं तें रत्न पाहा एकदा. नवऱ्याला तर पोलक्याच्या खिशांत ठेवलंच आहे—पण सासु-सासऱ्यालाही कनवटीला लावलं आहे तिनं. कांहीं म्हटल्या कांहीं रीत नाहीं, सर. सबंध जग ओस पडलं होतं—म्हणून त्यानं हें रत्न आणलं आहे घरीं.

**प्रो. शहाणे** : अशीं लग्नं टिकत नसतात फार काळ.

**पार्वती** : कळूं दे त्याला आपोआपच.

**प्रो. शहाणे** : पण त्याला लग्न करायला तुम्हीं परवानगी दिली कशी?

**पार्वती** : काय करायचं सर! नाहींतर जाणार होता घर सोडून तिच्याशीं लग्न करायला! तो एक गेला बायकोबरोबर—हाही जायचा. एवढं मोठं कुटुंब सर, पण प्लेगांत माणसं जायचीं तशीं घरांतून सगळीं पटापट जायला लागली तर मग राहाणार कोण घरांत? एवढ्यासाठीं यांनीं नाइलाजानं हो म्हटलं. पण तेही पस्तावले आहेत आतां यांची एकएक करणी बघून. बरं झालं शांताचं लग्न होतं आहे तें—नाहींतर तीही पोर बिघडली असती यांचे चाळे बघून. ( शांता चहा घेऊन येते. ) दे त्यांना. पाहिलंत किती लाजते आहे! वळणच तसं आमच्या घरांत!

**प्रो. शहाणे** : ( चहा पितां पितां ) म्हणूनच तर माझ्या मनांत ती भरली.

**शांता :** आई, आतां नाना—

**पार्वती :** मी घालते त्यांच्या कानावर. तूं नको काळजी करूं.

**शांता :** नाहीं–पण त्यांना मी परस्पर लग्न जमवलेलं पाहून—

**पार्वती :** प्रथम बोलतील ते–स्वभावच आहे त्यांचा. सगळं कांहीं त्यांना स्वतः करायला हवं.

**शांता :** पण त्यांनीं इतकीं वर्षं कुठं माझ्यासाठीं कांहीं खटपट केली ?

**पार्वती :** अग, तूं लहानच वाटत होतीस आम्हांला इतकीं वर्षं. करूं लग्न पुढल्या वर्षीं–असंच चाललं होतं इतकीं वर्षं.

**शांता :** पण त्यामुळं मी किती मोठी होत चालले तें दिसलंच नाहीं तुम्हांला.

**पार्वती :** पण आतां सारं झालं ना ? मग झालं तर.

**शांता :** पण नाना—

**पार्वती :** मी घालतें कानावर त्यांच्या—तूं नको काळजी करूं. ( पार्वतीबाई माडीवर जातात. )

**प्रो. शहाणे :** शांता, आतां मात्र पळ काढूं या इथून. तुझे नाना आईला सांगतील आणि—

**शांता :** हो–काय करणार आतां ?

**प्रो. शहाणे :** आत्तांच इथून जाऊं या.

**शांता :** हो–कारण आईला कळलं तर ती मला तुमच्याशीं लग्न करायला देणार नाहीं पण–पण—

**प्रो. शहाणे :** आतां पण नाहीं नि परंतु नाहीं. निघायचं असेल तर याच क्षणाला घराला रामराम ठोकून नीघ.

**शांता :** म्हणजे मला परत इथं येतांच येणार नाहीं ?

**प्रो. शहाणे :** लग्नानंतर तुला तुझे आईबाप घरांत घ्यायला तयार होतील असं वाटतं तुला ?

**शांता** : पण घर सोडून जायचं एकदम–म्हणजे—

**प्रो. शहाणे** : मग मी जाऊं ?

**शांता** : नको–नको–थांबा सर–मी येते–चला.

[ दोघे निघून जातात. आंतल्या खोलींतून बाजीराव व शोभा येतात. ]

**शोभा** : अं ?–कुठं गेलीं दोघं ?

**बाजी** : पळालीं कीं काय घरांतून ?

**शोभा** : आणि तुमची आई ? त्या तर होत्या इथं.

[ माडीवरून पार्वतीबाई व तिच्यामागून नाना येतात. ]

**पार्वती** : ( जिना उतरतां उतरतां ) कुठं गेली कार्टी ! पत्ता लागूं दिला नाहीं मला दोघांनी ! कुठं गेली शांता ?

**बाजी** : आम्हांला काय माहीत ?

**शोभा** : आम्हीं इथं येतो तर दोघंही गेलेली !

**नाना** : कुठं गेली ?–बाजी, बघून ये तिला.

**पार्वती** : चांगली फरफटत ओढून आण कार्टीला. प्रोफेसर म्हणे ! पहिली बायको जिवंत असतांना शांताशीं दुसरं लग्न करायला बघतो आहे ! आणि मी मेलीनं चहा दिला आणखी त्याला !

**बाजी** : पण आई, आतां ती परत येईल असं वाटतं तुला ?

**पार्वती** : काय बिशाद आहे तिची ? चांगली झिंज्या धरून आणीन.

**बाजी** : पण ती जर लग्न करणार म्हणते आहे, तर तिच्या इच्छेविरुद्ध तिला परत आणण्यांत तरी काय अर्थ ?

**नाना** : तूं शिकवूं नकोस आम्हांला. म्हणे तिच्या इच्छेविरुद्ध ! तिच्या इच्छेचा काय संबंध ?

**बाजी** : मग काय तुमच्या इच्छेप्रमाणं तिनं वागायला हवं ?

**नाना** : वागायला हवं म्हणजे काय–अलबत वागायला हवं.

**बाजी** : ( मनाची तयारी करीत ) नाना, आतांपर्यंत तुम्हीं असा कधीं विचार केला आहे, कीं शांता आपल्या बरोबरीच्या मुलींचीं लग्नं झालेलीं पाहून स्वतःच्या मनाशीं किती कुढत असेल ?

**पार्वती** : कांहीं कुढत नव्हती.

**बाजी** : कसं कळणार हें तुला आई ? कुठली मुलगी स्वतःच्या तोंडानं हें सांगेल ? तिचं लग्न तुम्हीं पूर्वींच केलं असतं तर, तिला पहिले-पणाचा नवरा मिळाला असता—चांगला नवरा मिळाला असता. पण तिनं इतकीं वर्षं तुमची वाट पाहून अखेर नाइलाजानं हा दुसरेपणाचा नवरा—ज्याला ही शोभा सेकंडहँड म्हणते—असा नवरा गांठला तर तिचा काय अपराध ?

**नाना** : म्हणून काय आम्हीं असल्या माणसाशीं तिचं लग्न झालेलं उघड्या डोळ्यांनीं पाहाणार ? मोठा आला आम्हांला अक्कल शिकवायला !

**बाजी** : मला तुम्हांला अक्कल शिकवायची महत्वाकांक्षा नाहीं. पण इथं तुम्हीं तिच्या लग्नाच्या आड येण्यांत भयंकर चूक करता आहां, हें मात्र मी तुमच्या तोंडावर सांगायला मागेपुढं पाहाणार नाहीं. वैतागलेल्या मनानं तिनं मिळेल तो पुरुष गांठला आहे.—आणि तुमच्या म्हणण्याप्रमाणें तिला हें लग्न सुखाचं झालं नाहीं, तर तो अपराध तुमचा—तिचा नव्हे. आजपर्यंत तुम्हीं तिच्या लग्नाबद्दल कधींहि आस्था दाखवली नाहीं. किती वर्षं वाट बघायची तिनं ? दांत पडून म्हातारी होईपर्यंत ? आणि आतां तिनं आपल्या वयाच्या मानानं नवरा पाहिला, तर तो दुसरेपणाचा या सबबीवर पुन्हां तिला मागं खेंचून घरांत आणून बसवायचं ?

**नाना** : मुलांचं हित आम्हांला कळतं. तुला अजून मिसरूड फुटली नाहीं, हें लक्षांत ठेव.

**शोभा** : लांब मिशाचा माणूस जास्त अनुभवी असतो म्हणायचा!—वाढवा हो तुम्हीं उद्यांपासून मिशा!

**नाना** : तोंड संभाळून बोल. तूं कुणापुढं बोलते आहेस, असं वाटतं तुला?

**पार्वती** : भारीच शेफारली आहे! अजून काय आपल्या बापाच्याच घरीं आहेस, असं वाटतं आहे तुला? इथं सून म्हणून आली आहेस तूं.

**शोभा** : छे:—यांची बायको म्हणून.

**पार्वती** : त्याची बायको ती आमची सून होते.

**शोभा** : वाचलं आहे मीं लहानपणीं पुस्तकांत—मुलाची बायको ती आईची सून होते!

**पार्वती** : हो–हो—होते म्हणजे होतेच.

**नाना** : तुला सून म्हणायला आम्हांला जसा कांहीं अभिमानच वाटत असेल!

**पार्वती** : बिचारी लक्ष्मी कधी तोंड वर करून बोलली नाहीं दोन वर्षांत!

**बाजी** : पण एकदा बोलली ती शेवटचंच बोलून गेली! आतां कसले तिचे गुण गातेस? तिच्यांसारखी सहनशील बाईही या घराला विटली, यांतच काय तें तुम्हीं समजा म्हणजे झालं. वहिनीच्या पायानं—हिच्या पायेनं या घरांत लक्ष्मी चालून आली—भाग्यलक्ष्मी घरांत आली, असं तुम्हांला कधीं तरी चुकून वाटलं? उलट, आणखी दोन माणसं आपल्या सत्तेखालीं आलीं, असंच तुम्हांला वाटलं. ही तुमची सर्वाधिकाऱ्याची जाणीव तुम्हीं मनांतून काढून टाकली असती, तर या घरांतून जावंसं कुणाला वाटलं असतं? वहिनी गेली, दादा गेला, शांता गेली—

**नाना** : आणि आतां तूंही चालता हो घरांतून. फार ऐकलं तुझं मघांपासून. तुझ्यासारख्या टिचभर पोरानं मला म्हाताऱ्याला बुद्धि

शिकवायची अजून पाळी आली नाहीं. इतकी वर्षं संसार केला—या जगाचा अनुभव घेतला—

**बाजी** : तो फुकट गेला असं अजून देखील तुम्हांला वाटत नाहीं? गेलेलीं वर्षं जमेस धरण्यांत काय अर्थ आहे? आमचीं बाळपणांतलीं वर्षं आणि तुमची गेलेलीं वर्षं सारखींच निरुपयोगी. आजची परिस्थिति काय आहे, कांहीं वर्षांपूर्वी रांगत असलेली या घरांतली मुलं आतां केवढीं मोठीं झालीं आहेत, आजच्या जगांतील वातावरणाचा त्यांच्या तरुण मनावर काय परिणाम घडून आला असेल, याची दखल तुम्हीं घेतली नाहीं तर—तर या घरांत शेवटीं तुम्हीं दोघंच राहाल.

**नाना** : हो हो—आम्हीं दोघंच राहूं. कुणाला धमक्या देतोस ह्या? तुम्हीं जन्माला यायच्या पूर्वी दोघंच होतों आम्हीं घरांत—त्यावेळीं नाहीं राहिलों आम्हीं?

**बाजी** : हो—त्यावेळीं राहिलांत. पण आतां ती परिस्थिती उरली नाहीं. त्यावेळीं पुढच्या अपेक्षेवर दोघं राहात होतां—आतां तुम्हांला घर खायला येईल. म्हणून म्हणतों, अजून विचार करा.

**नाना** : केला—चांगला विचार केला. आणि अजून तुला घरांतून कां हांकलून लावला नाहीं, याचा पस्तावा वाटतो आहे आम्हांला.

**बाजी** : ठीक आहे. आम्हीं घरांतून जावं, अशी तुमची इच्छा आहे. आम्हीं आपण होऊन जात नाहीं. तुम्हीं मला आणि माझ्या बायकोला—तुमच्या सुनेला घरांतून घालवून देतां आहां—देव तुमचं कल्याण करो. चल. (आंतल्या खोलींत जातो.)

**शोभा** : जातांना नमस्कार करायला हवा का मी?

**पार्वती** : तुला तुझ्या घरांत आईबापानीं रीत लावली असेल तर ना!

**शोभा** : आई मला म्हणाली होती—पण घरांतून सासुसासऱ्यांनी हांकून लावल्यावर त्यांना जातांना नमस्कार करायला हवा कीं नाहीं,

हें मात्र तिनं सांगितलं नाहीं. कारण तिला कल्पनाच नव्हती, जगांत असले सासु-सासरे असतात म्हणून !

**पार्वती** : आणि असल्या सुना असतात का जगांत–तेंही विचार तिला !–पूजा करायची आहे ना ? पाणी काढते आंघोळीला. ( आंत जाते. )

**नाना** : हो–हो–काढ.

[ तेही तिच्या मागोमाग आंत जातात. शोभा एकटीच दोघे गेलेल्या दिशेकडे पाहात राहाते.

**शोभा** :

हासतां । खेळतां । प्रेम सफल झालें ॥
विविधरूप संसारीं सौख्य नांदलें ।
हरुनिया । आपदा । जीवन सारें हें रम्यमधुर झालें ॥ धृ०॥
रूचिर भाव अंतरिं या । वसती कां मनुजाच्या ॥
हृदयिंची । संपदा । अर्पियली का ही ।
सौख्य जरि न लाभे ॥ १ ॥

गाणें संपल्यावर बाजीराव आपल्या व शोभाच्या कपड्याच्या दोन बॅगा व इतर सामान घेऊन येतो. ]

**शोभा** : निघायचं ?

**बाजी** : हो.—

**शोभा** : अबाउट टर्न. ( स्वतः वळते.) कुइक् मार्च !

[ त्याच्या हातांतली एक बॅग घेऊन लष्करी शिस्तींत दरवाजांतून बाहेर पडते. बाजी मागे पाहात गंभीर मुद्रेनें तिच्या मागून जातो.

थोडा वेळ स्टेज रिकामें असतें. थोड्या वेळानें नारायण बावरलेल्या मनःस्थितींत येतो. आसपास पाहातो. जिन्याच्या दोन चार पायऱ्या चढून परत खालीं येतो. नाना खडाव घालून आंतल्या खोलींतून माडीवर जाण्यासाठीं येतात. ]

**नाना** : नारायण—

**नारा** : नाना—

**नाना** : एकटाच आलास ?

**नारा** : हो–एकटाच. नाना, मी निघून गेलों, म्हणून तुम्हांला आणि आईला खूप वाईट वाटलं असेल–माझा राग आला असेल, पण–पण मी परत आलों आहे. मला तुम्हांला सोडून रहाणं–हें घर सोडून राहाणं असह्य झालं.

**नाना** : मग आज दोन महिने कसा राहिलास ?

**नारा** : कसा राहिलों तें माझं मला माहित. एक दिवस—एक क्षण मी तुम्हांला विसरूं शकलों नाहीं. पण लक्ष्मीला सांगण्याचं मला धैर्य होईना. मला काय होतं आहे, तें तिला कळत होतं. पण तिनं कधी एका शब्दानं मला विचारलं नाहीं. माझं मन निरनिराळ्या गोष्टींत रमावं, म्हणून ती खटपट करीत होती. पण माझं मन ती रमवूं शकली नाहीं–मला तुमचा विसर पाडूं शकली नाहीं.

**नाना** : ती काय तुला आमचा विसर पाडणार ? तिचा तुझा दोन वर्षांचा सहवास.

**नारा** : हो–इतकी वर्षं मी इथं वाढलों–तुमच्या हाताखालीं वाढलों. तुम्हीं ऊठ म्हटलं म्हणजे उठायचं, आणि बस म्हटलं कीं बसायचं, एवढंच मला माहित.

**नाना** : शिस्तच होती आमची तशी.

**नारा** : हो–पण तुमच्या शिस्तीनं माझ्या आयुष्याचं काय केलं आहे, तें तुम्ही पाहिलंत ? आज पंचविशी उलटून गेलेला मी–पण तुमच्या हातांतलं नुसतं कळसूत्री बाहुलं होऊन बसलों आहे. तुम्हीं नाचवाल तसं मी नाचायचं–तुम्हीं बोलाल तें मी बोलायचं–तुमचे विचार, तुमची मतं—सारंसारं कांहीं माझ्या रक्तांत भिनून गेलं आहे. माझा मी राहिलोंच नाहीं. तुमच्यांतच सामावून गेलों आहे मी. लक्ष्मीनं मला ओढून नेलं–तरी मी तुमच्यापासून दूर झालेलों नाहीं.

माझा देह फक्त तिच्याबरोबर गेला. कारण तो तिचा झाला होता. पण मन इथंच तुमच्यापाशीं राहिलं.

**नाना** : तें घेऊन जायला आला आहेस ?

**नारा** : मी काय नेऊं शकणार ? तें माझं राहिलं आहे कुठं ? मला तें तुमच्यापासून नेण्याची शक्ति नाही. मला तुम्हीं दुबळं करून टाकलं आहे–पांगळं करून टाकलं आहे. मला तुम्ही स्वतंत्रपणानं विचार करायला आजपर्यंत सवड दिली नाहीं. तुमच्या इच्छेप्रमाणं माझं पळापळानं आयुष्य वाढलं आहे. इतकीं वर्षं मीही समजत आलों, तुमच्या सत्तेखालीं सर्वांनीं या घरांत निमूटपणं दोन वेळा जेऊन ढेंकर देण्यांत समाधान आहे. कुटुंबांत शांति नांदण्यासाठीं तुम्हीं जी शिस्त आम्हांला लावली, तीच बरोबर आहे, असं मला आतांपर्यंत वाटत होतं.

**नाना** : आणि आतां तुला ती चुकीची वाटली ?

**नारा** : हो–दोन महिने तुमच्यापासून देहानं दूर गेल्यावर मला माझा दुबळेपणा कळून आला. तुम्हीं आम्हां साऱ्यांना आपल्याच आत्म्यांत विलीन करून टाकलंत–त्याचे दुष्परिणाम मला या दोन महिन्यांत कळून आले, पांगुळगाड्याशिवाय रांगतं मूल चालूं शकत नाहीं तसं तुमच्या पांगुळगाड्याशिवाय मला हालतां येईना–चालतां येईना–बोलतां येईना–विचार देखील करता येईना. बाजीराव लवकर सावध झाला. त्याला तुम्हीं उडाणटप्पू म्हणत होता–मीही त्याच दृष्टीनं त्याच्याकडे पाहात होतो. पण तोच शहाणा होता. कुठं गेला तो ?

**नाना** : हांकून लावला मी त्याला आणि बायकोला.

**नारा** : (हर्षभरानें) हांकून लावला ? सुटला बिचारा.

**नाना** : काय म्हणतोस ?

**नारा** : सुटला बिचारा. माझ्यापेक्षां त्याला इथं राहाणं जास्त कष्टाचं झालं असणार. मी काय–बोलून चालून पांगळा झालो होतों. पण

त्याला स्वतःचे पाय होते-त्याला पाय असून या घरांत अडकून पडावं लागलं होतं. तें तर जास्तच कष्टाचं. गेला-सुखी झाला!

**नाना** : काय म्हणतो आहेस तूं हें?

**नारा** : तो सुखी झाला-जिवंत झाला. मी मात्र मेलों आहे.

**नाना** : नारायण-नारायण—

**नारा** : काय नाना! मी जात नाहीं आतां इथून. मला पाय कुठं आहेत? तुमच्या पांगुळगाड्याशिवाय मी कसा चालणार? बिचारी लक्ष्मी! तिचं मात्र मी जन्माचं नुकसान केलं. दोन वर्षं माझ्यासाठीं तिनं या घरांत काढली. तिला चालतां येत असून देखील मी तुमच्या पांगुळगाड्याला धरून चालायला सांगत होतो तिला. पण ती अखेर कंटाळली-वैतागली-आणि-आणि निघून गेली. मी पुन्हां आलों आहे-तिला सोडून आलों आहे. मला ती मोकळी हवा मानवत नाहीं. मला हेंच कोंदटलेलं-बुरसलेलं वातावरण हवं. याच वातावरणांत मी वयाची सत्तावीस वर्षं काढली.—आम्हांला जन्म देण्याचे आमच्यावर तुम्हीं उपकार केले. पण त्याचा मोबदला मात्र केवढा तरी घेतलात. आम्हांला नुसता जन्म देऊनच तुम्हीं थांबला नाहीं; आपल्या हक्काच्या मालमत्तेची माणूस जशी इच्छा येईल तशी विल्हेवाट लावतो-तशी आमचीहि तुम्हीं विल्हेवाट लावली आहे. नुसता जन्म देऊनच नव्हे, तर जन्मभर आमचा बाप म्हणून तुम्हांला आमच्यावर सत्ता गाजवायची इच्छा होती.-आणि तुम्हीं ती तडीला नेली आहे. पण त्यावेळीं आमचं काय होतं आहे, इकडे ढुंकून देखील तुम्हीं पाहिलं नाहीं. एकत्र कुटुंबाचे गोडवे तुम्हीं नेहमीं गातां-मीहि गात होतों-पण एकत्र कुटुंबांत अशी मालकशाही गाजवून चालत नाहीं, हें मात्र तुमच्या लक्षांत आलं नाहीं. आवळ्याची मोट बांधणं आणि एका घरांत दहा माणसांनी गुण्या-गोविंदानं राहाणं सारखंच आहे, हें तुम्हीं विसरलां. मुलं मोठीं झालीं, तरी त्यांना आपल्याच इच्छेप्रमाणं वागायला

लावायचं–दुसऱ्या घरच्या मुली सुना म्हणून आल्या तरी त्यांच्यावरही आपल्याच मतांची सक्ति करायची–आणि एकत्र कुटुंबाच्या सुखाची अपेक्षा करायची–कसं शक्य आहे हें नाना? मला माहीत आहे–बाजीराव आपल्या बायकोबरोबर आतां सुखानं राहूं शकेल. मीही राहिलों असतों, पण–पण—

**पार्वती** : ( आंतून येत ) कोण नारायण?–अरे–तूं आलास?

**नारा** : होय आई.

**पार्वती** : बरं झालं आलास तो. कसं खायला आलं होतं घर. आत्तां बाजी गेला–अगदीं उघडं उघडं वाटलं असतं आम्हांला! तो गेला तर गेला–बरं झालं तूं आलास. आतां मात्र तूं आम्हांला सोडून जाऊं नकोस.–जायला निघालास तरी जाऊं देणार नाहीं मी तुला.

**नाना** : नारायण इथं राहातां नये–त्याला क्षणभर देखील घरांत राहूं देणार नाहीं मी! ( असें म्हणून वेगानें जिना चढून जातात. )

**नारा** : नाना—

**पार्वती** : हें काय?

[ पडदा पडतो ]

# अंक ३ रा

[ लक्ष्मी आणि नारायण राहात असलेला ब्लॉक. जागा छोटी पण आधुनिक बांधणीची आहे. लक्ष्मीची सौंदर्यदृष्टि तेथील निवडक फर्निचर, भिंतीवरील चित्रें, आणि इतर बाबतींत प्रत्ययाला येते.

यावेळीं लक्ष्मी एक गाणें म्हणत आहे. पण त्या गाण्यांत तिचें मन रमलेलें मुळींच दिसत नाहीं. उलट आपल्या मनाला नको त्या विचारापासून परावृत्त करण्यासाठीं ती हा विफल प्रयत्न करीत असावी, असें वाटत आहे.

**लक्ष्मी :**

**भुललें उगा सुखास वेडें मन हें ।**
**मृगजल हा संसारचि केवि नाकळे ॥ धृ ॥**
**देव नाहीं मंदिरीं । गगन शशिविना ।**
**तेंवि सुनें स्त्रीजीवन पतिवांचुनी हें ॥ धृ ॥**

गाणें संपल्यावर बाजीराव आणि शोभा येतात. ]

**बाजी :** ( बाहेरून हांका मारीत येत ) वहिनी–ए दादा–अरे कुठं आहां तुम्ही ?

**लक्ष्मी :** इथंच आहे मी.–पण एवढा कसला आनंद झाला आहे तुम्हांला ?

**बाजी :** आनंद ?–तुरुंगांतून सुटल्याचा–पिंजऱ्यांतून सुटल्याचा—

**लक्ष्मी :** म्हणजे ?

**बाजी :** म्हणजे काय ? तुम्हीं आमच्या हातीं आपला अधिकार देऊन गेला; तरी जिथं राम नाहीं–सीता नाहीं–तिथं हा भरत कसा राहील ?

**शोभा :** आणि जिथं भरत नाहीं–तिथं त्याची बायको तरी कशी राहील ?

**लक्ष्मी :** म्हणजे–म्हणतां तरी काय तुम्हीं ?

**बाजी** : इतकं सांगितल्यावरही कळत नाहीं तुला ?–ऐक. ज्या नानांच्या घरांतून तूं दादाला घेऊन निघून गेलीस त्या घरांतून आज आम्हांलाही नानांनी 'चले जाव' म्हणून सांगितलं.

**लक्ष्मी** : कां ?

**बाजी** : कारण–शांतानं लग्न करायचं ठरवलं, तें नानांना पसंत पडलं नाहीं–आणि मी तिला माझा पाठिंबा दिला. बस्स–सार्वभौम नानांना एवढा विरोधही मला हांकून लावायला पुरेसा झाला.

**शोभा** : शिवाय ते आमच्यावर जरा रुष्टच होते. आम्हीं त्यांना जुमानीत नाहीं–त्यांच्या पुढ्यांत परस्पराशीं हंसतो–खिदळतो, हें त्यांना पसंत नव्हतं. त्यांचं म्हणणं असं असावं बहुतेक, कीं दिवसभर स्वयंपाकखोलींत सासुबाईच्या हाताखालीं मी राबावं, दिवसभर यांना दर्शन देऊं नये कीं यांचं दर्शन घेऊं नये, आणि रात्रीं जेवणं होऊन सर्व आवराआवर करून झाली, कीं पाणी भरलेला तांब्या घेऊन, सासु-सासरे झोपलेले पाहून, लाजत लाजत हळुच यांच्या खोलींत जावं !

**लक्ष्मी** : त्यांतही एक प्रकारची गोडी असते !

**शोभा** : हो–पण आम्हीं सुनांनीं तशा रीतीनं वागण्यांत गोडी मानावी, असं घरांत खेळीमेळीचं वातावरणही हवं. इथं तर काय–सारी हिटलरशाही ! करीन ती पूर्व ! असल्या ठिकाणीं सुनेच्या सगळ्या आशा–आकांक्षेचा कसा चेंदामेंदा होतो–याचं हें जिवंत उदाहरण आहेच कीं आमच्यापुढं !

**बाजी** : आम्हांला आमचं घर वाटण्याइतका जिव्हाळा लागला पाहिजे ना आधीं ! मला समजूं लागल्यापासून मला आठवत नाहीं, कीं एक दिवस मला कधीं त्या घराबद्दल आपलेपणा वाटला असेल ! 'माझं घर' अशी ओढ मला चुकूनसुद्धां कधीं वाटली नाहीं. तरीही आपण होऊन शक्य तों घर सोडायचं नाहीं, असं मी ठरवलं होतं.

पण आज नानानींच 'चले जाव' म्हटल्यावर प्रश्नच उरला नाहीं. हिच्या घरीं बाड-बिस्तरा टाकला आणि प्रथम म्हटलं तुला आणि दादाला ही आनंदाची बातमी सांगावी.-दादा अजून आला नाहीं ऑफिसांतून ?

**लक्ष्मी :** आज दोन दिवस ते ऑफिसांत गेले नाहींत.

**बाजी :** कां-आजारी आहे कीं काय ?

**लक्ष्मी :** हो.

**बाजी :** ( आंतल्या खोलीकडे जात ) कुठं आहे तो ?

**लक्ष्मी :** इथं नाहीं.

**शोभा :** म्हणजे ? कुठं हॉस्पिटलांत आहेत कीं काय ?

**लक्ष्मी :** हो—आपल्या वडिलांच्या हॉस्पिटलांत !

**बाजी :** म्हणजे-म्हणतेस काय तूं वहिनी ?

**लक्ष्मी :** ते आपला आजार बरा करण्यासाठीं नुकतेच थोड्या वेळापूर्वी आपल्या नानांच्या घरीं राहायला गेले आहेत.

**बाजी :** म्हणजे ? इथं येणार नाहीं तो परत ?

**लक्ष्मी :** असंच समजून चालले आहे मी.

**बाजी :** ( शोभास ) बघ-मी म्हणालो होतों तुला-दादा केव्हां ना केव्हां परत घरीं जाईल.

**लक्ष्मी :** आज दोन महिने ते राहिले हेंच आश्चर्य ! ह्या दोन महिन्यांत एक दिवस देखील त्यांचं मन या इथं नव्हतं. मी खूप प्रयत्न केला. त्यांना काय होतं आहे, हें माहित असूनही त्याबद्दल कधीं चुकून उल्लेख करीत नव्हतें. अगदी नवीन आयुष्यांत त्यांचं मन गुंतावं, यासाठीं मी नाना तऱ्हेनं खटपट करीत होतें. पण-पण तें सारं व्यर्थ गेलं. आज दोन दिवस ते घरीं आहेत. अखेर मलाच त्यांची कीव आली, आणि त्यांना मी 'जा' म्हटलं.

**शोभा** : आणि ते आनंदानं गेले ?

**लक्ष्मी** : आनंदानं गेले असं कसं म्हणूं मी ? माझ्यासाठीं त्यांचं मन तळमळल्याशिवाय कसं राहील ?

**शोभा** : मग ते गेले कां इथून ?

**लक्ष्मी** : कारण मी त्यांची दोन वर्षांची मायेची ! नानांची ओढ सत्तावीस वर्षांची आहे.

**शोभा** : तुम्हांला संताप कसा येत नाहीं याचा ?

**लक्ष्मी** : संताप ? कुणावर संतापूं ? नानांशिवाय आणि आईशिवाय त्यांना राहवत नाहीं, यांत त्यांचा काय दोष ? जन्मापासून त्यांचं शरीर, मन, इच्छा, विचार सारं सारं कांहीं नानांनीच घडवल्यावर, त्यांच्या ह्या वर्तनाबद्दल मी रागाऊं तरी कशी त्यांच्यावर ? मी सांगितलं ना तुला,–मला अखेर त्यांची कींव आली आणि मी त्यांना ' जा म्हणालें.

**शोभा** : आणि तेही गेले !–वा : !

**बाजी** : नाना त्याला आतां काय बोलतील आणि काय नाहीं !

**लक्ष्मी** : छे :, कांहीं बोलणार नाहींत. आतां तुम्हींही घरांत नाहीं.

**बाजी** : खरंच–मी असायला हवा होतो–दादाला धक्के मारून हांकून लावला असता परत.

**लक्ष्मी** : म्हणजे बिचाऱ्यांची अगदींच शोचनीय स्थिति झाली असती ! अगदी चूक झाली असती तुमची तीं ! हा व्यक्तीचा दोष नाहीं. आपल्या कुटुंबपद्धतीचा दोष आहे हा. एका घरांत सर्वांनीं गुण्यागोविंदानं राहावं, ही कल्पना गोड आहे. पण त्या सर्वांपैकीं प्रत्येकाला वाटलं पाहिजे, कीं हें माझं घर आहे.

**बाजी** : असं वाटायला सर्वांशीं खेळीमेळीनं वागायला हवं वडिल माणसांनीं ! पण इथं काय–हम करेसो कायदा ! ( नानांची नक्कल करीत )

माझं मत तें साऱ्यांचं मत! मी सांगेन तें साऱ्यांनी ऐकायला हवं!' असली सुलतानशाही करायला लागल्यावर कुणाला वाटेल हें माझं घर आहे म्हणून?

**शोभा** : आणि खापर फोडायचं आमच्या माथीं—कीं आम्हीं नवऱ्याबरोबर हंसतो—खिदळतो, फिरायला जातो, अमुक करतो आणि तमुक करतो! अशा वेळीं त्यांना असं कसं वाटत नाहीं, कीं नुकतंच लग्न झालं आहे, हंसता—बागडताहेत; उद्यां पोक्तपणा आला आणि संसाराची जबाबदारी पडली म्हणजे त्यांचं हें हंसणं—खिदळणं कांहीं राहायचं नाहीं!—पण छेः!

**बाजी** : म्हणजे पहा ना! अखंड हिंदुस्तान तर व्हायला हवं आणि सर्वांना समान हक्क मात्र द्यायला नकोत! त्यांतलाच प्रकार हा! नानांना वाटत असावं, हीं पोरं काय संसार करणार! पण संसार करायला म्हातारपणापर्यंत जर आम्हीं वाट पाहायची, तर या तरुणपणीं आम्हीं करायचं काय?

**शोभा** : आणि संसार—संसार तो तरी काय? बरोघर काय तुमच्या नानांच्याच मताप्रमाणं संसार चालला आहे?

**लक्ष्मी** : (विषय बदलण्याच्या हेतूनें) शांतावन्संनीं कुणाशीं लग्न करायचं ठरवलं आहे?

**बाजी** : पकडला आहे तिनं कॉलेजांतला एक प्रोफेसर!

**लक्ष्मी** : मग कांहीं वाईट नाहीं.

**शोभा** : हो—पण तो सेकंडहँड आहे.

**लक्ष्मी** : म्हणजे?

**बाजी** : त्याची पहिली बायको जिवंत आहे.

**लक्ष्मी** : असं?

**बाजी** : मग शांताला काय आतां पहिलेपणाचा नवरा मिळणार आहे? आणखी थोडी वर्षं ती थांबली असती, तर पेन्शनच

घ्यावी लागली असती तिला ! पण इतक्या वर्षांत नानांनीं किंवा आईनं तिच्या लग्नाचा आस्थेनं विचार केला असेल तर शपथ ! आणि आतां तिनं आपण होऊन लग्न करायचं ठरवतांच यांच्या सार्वभौम सत्तेला धक्का बसला ! खरंच, दादा परत गेला नसता, तर नाना आणि आई दोघंच त्या घरांत किती दिवस एकटी राहणार होती, हें पाहायचं होतं मला. आम्ही सारीं घरांत होतों, तोंपर्यंत त्यांना आमची किंमत कळली नव्हती. आतां मात्र घर खायला आल्यावर त्यांना वाटायला लागलं असतं—

**शोभा** : पण आतां तो प्रश्नच उरला नाहीं. तुमचे दादा त्यांच्या घरीं गेले आहेत—

**बाजी** : अगदीं घात केला त्यानं ऐन वेळीं. जाऊं का असाच त्याला परत आणायला ?

**लक्ष्मी** : छेः, त्यांत काय अर्थ ?

**बाजी** : नाहीं कसा ? मी अगदीं नानांना बजाऊन आलों आहे, कीं आम्हांलाही तुम्हीं घरांतून घालवून देतां आहां—पण तुम्हीं दोघंच घरांत राहिल्यावर तुम्हीं आमच्यासाठीं वेडे व्हालं ! आणि खरंच, मला त्यांना त्या स्थितीला आणायचं होतं. आपण होऊन ते आपल्या दारांत यायला पाहिजे होते.–'आम्हीं चुकलों, आम्हांला क्षमा करा आणि परत तुम्हीं सारे जण घरीं या' असे त्यांचे उद्गार एक दिवस ऐकायला मिळतील ह्या आशेवर होतों मी ! पण दादा म्हणजे दादाच आहे हा !

**लक्ष्मी** : त्यांना दोष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं–सांगितलं मी तुम्हांला एकदा.

**शोभा** : हो–आतां नानांनाच कांहीं वाटलं तर !

**बाजी** : त्यांना कशासाठीं वाटणार ? ते म्हणतील, आला कीं नाहीं एक मुलगा नाक मुठींत धरून ? आतां हळुहळु दुसराही येईल.

आणि पुन्हां सारी मंडळी जमली म्हणजे सर्वांवर आणखी दुप्पट जोरानं सत्ता चालवतां येईल !

**शोभा** : पण एखाद वेळीं त्यांना असं नाहीं वाटायचं, कीं तुमचे दादा बायकोला सोडून आले, हें कांहीं बरं झालं नाहीं; त्यांना चार समजुतीचे शब्द सांगून परत पाठवावं

**बाजी** : कुणाबद्दल म्हणते आहेस तूं हें ? नानाबद्दल ? अजून दोन महिने पुरे झाले नाहींत तुला नानांचा सहवास घडून !

**लक्ष्मी** : कशावरून वाटणार नाहीं त्यांना ?

**बाजी** : तुलाही दोन वर्षं पुरी झाली नाहींत अजून त्यांचा सहवास घडून ! पण मी त्यांचा बावीस वर्षांचा जुना कैदी आहे !

**लक्ष्मी** : माणसाच्या मनांत केव्हां परिवर्तन होतं, सांगतां येत नाहीं. मीं लग्न करून तुमच्या घरीं आलें तेव्हां मला कधीं चुकून तरी वाटलं होतं, कीं एक दिवस मी त्या घरांतून जाईन ? माणसांच्या आयुष्यांत आकस्मिक घटना केव्हां घडतील, याचा नेम नाहीं.

**बाजी** : त्या आशेवरच राहणार असलीस तूं, तर आमचं कांहीं म्हणणं नाहीं. त्यासाठीं खुशाल वाटलं तर वटसावित्रीचं व्रत कर ! यमानं जसा सावित्रीला तिचा नवरा परत दिला तसा नानाही तुला देतील !

[ नाना, पार्वतीबाई व त्यांच्या मागून नारायण येतो. ]

**शोभा** : अं ? हें काय ?

**नाना** : बायकोला सोडून माझ्याकडे आला !–लग्न कशाला करून दिलं होतं ? ( त्यांच्या त्या उद्गारांनी सर्वच जण एकमेकाकडे आश्चर्यानें पाहातात. ) बायकोबरोबर घरांतून निघून गेला–आणि तिला एकटी-लाच सोडून परत आला !–कसा घेईन मी याला परत घरांत ?

**लक्ष्मी** : पण त्यांना इथं करमत नाहीं—

**नाना** : ( टोपी आणि कोट काढीत ) कसं करमत नाहीं तें पाहातों. इथंच राहाणार आहे मी आतां.

**शोभा** : (लक्ष्मीस) म्हणजे तुमचा सासुरवास अजून संपलेला दिसत नाहीं!

**नाना** : काय म्हणते आहे ती लवंगी मिरची?

**बाजी** : ती म्हणते आहे, कीं वहिनींचा सासुरवास अजून संपलेला दिसत नाहीं.

**नाना** : असं असं. आणि तुझा संपला असं वाटतं होय तुला?–लक्ष्मी–तुझं काय म्हणणं आहे?

**लक्ष्मी** : तुम्हीं इथं राहिलां तर मला नकोसं कसं होईल? तुमच्यामुळं तरी यांना बरं वाटेल. यांना बरं वाटावं म्हणून तर मी पाठवलं होतं.

**पार्वती** : तूंच पाठवलंस?

**शोभा** : छान. कांहीं पुरुष बायकोसाठीं आईबापांना टाकतात–यांनीं सासुसासऱ्यासाठीं नवऱ्याला टाकलं! आहे कीं नाहीं?

**लक्ष्मी** : पण ह्या टाकण्यांत नवऱ्याच्या कल्याणाखेरीज दुसरा कसलाही हेतु नव्हता. इथं त्यांना करमत नसतांना डांबून ठेवण्यांत मी त्यांचं काय कल्याण करणार होतें? जिथं त्यांना बरं वाटेल, तिथंच त्यांना पाठवण्यांत मी त्यांचं हित केल्यासारखं झालं असतं.

**नाना** : अस्सं–म्हणजे तूं होऊन नारायणाला माझ्याकडे पाठवलंस!

**लक्ष्मी** : हो.

**नाना** : आणि मी त्याला तसाच जन्मभर ठेऊन घेतला असता तर?

**लक्ष्मी** : तर–तर ते सुखी झाले असते.–तुम्हांलाही बरं वाटलं असतं.

**बाजी** : अग, पण तूं नवरा असून एकटीच जन्म काढणार होतीस!

**लक्ष्मी** : बायकांच्या नशिबीं केव्हां ना केव्हां एकटेपण येतंच. ह्यामुळं तें सहन करायची त्यांच्या मनाची तयारी असते. पण पुरुषांना मात्र हें एकटेपण सहन करायची शक्ति नाहीं–हें मी आज दोन महिने अहोरात्र पाहून घेतलं. यांचं पोरकेपण बायकांच्या वैधव्यापेक्षांही

दुःसह! मी एकटी पडले तरी चालेल, पण यांचं पोरकेपणाचं दुःख नाहींसं करणं मला जास्त जरुरीचं वाटलं. पत्नि ही पतीची दासी असते, सखी असते आणि माताही असते म्हणतात. पण ही तिन्ही नातीं यांच्या बाबतींत असमर्थ ठरलेली पाहिली, तेव्हां मात्र मला यांच्यावर तुमचं किती वर्चस्व आहे, याची पूर्ण जाणीव झाली–आणि खरं सांगते–तुमची अत्यंत चीड आली. एका हाडामासाच्या तरुणाचं तुम्हीं केवढं निर्जीव बाहुलं करून टाकलं आहे–एका माणसाच्या आयुष्याचं कसं मातेरं करून टाकलं आहे–हें पाहून मला तुमच्या-बद्दल किती तिरस्कार वाटला असेल, तें मला आतां तुम्हांला सांगतांही येत नाहीं. आपल्या संततीचा मोठेपणीं राष्ट्राला, समाजाला, निदान कुटुंबाला तरी उपयोग व्हावा, एवढी दक्षता आईबापांनीं त्याचं संगोपन करतांना घ्यायला हवी म्हणतात. पण देश आणि समाज तर राहोच–पण कुटुंबाला उपयोग होण्याच्या दृष्टीनंही आपला मुलगा नालायक व्हावा–एवढीच तुम्ही खबरदारी घेतली. आपल्या मुलाच्या आयुष्याचं मातेरं करण्याचा गुन्हा तुम्हीं केला आहे–हें तुम्हांलाही नाकारतां येणार नाहीं. आणि माझ्याशीं त्यांचं लग्न लाऊन माझ्याही आशा-आकांक्षा तुम्हीं जाळून पोळून नष्ट केल्या आहेत.

**बाजी** : या गुन्ह्याबद्दल शासन द्यायचा अधिकार तुला मिळाला तर तूं काय शिक्षा फर्मावशील?

**शोभा** : मी सांगूं?

**नाना** : तुझा आम्हीं कांहींच गुन्हा केलेला नाहीं.

**शोभा** : नाहीं कसा?–धाकटी सून सासु-सासऱ्यांची खूप लाडकी असते म्हणतात. पण तुम्ही माझे कधींच लाड केले नाहींत.

**पार्वती** : नवरा काय थोडे करतो आहे?

**नाना** : हो–लक्ष्मीला कुठूनच हें सुख लाभलं नाहीं.

**बाजी** : यापुढं तुम्हीं व्याजासकट त्याची फेड करायला हवी.

**नाना** : म्हणूनच आम्हीं नारायणाला घेऊन इथं आलों आहों.

**शोभा** : म्हणजे ?

**नाना** : यापुढं आम्हीं या घरांतच राहायचं ठरवलं आहे.

**शोभा** : मग इतके दिवस एकत्र राहात होताच कीं !

**नाना** : हो–पण त्यावेळीं तुम्हीं सारे माझ्या घरांत राहात होतां; आतां मी तुमच्या घरांत राहायला आलों आहे.

**लक्ष्मी** : खरं ?

**नाना** : खरं म्हणजे काय–एकदम खरं.

**बाजी** : आणि तें घर ?

**नाना** : बंद. चांगलं कुलुप ठोकून आलों आहे भलं भक्कम. हा मी आलों आहे, एवढंच त्या घरांतलं आहे. बाकी सगळं तिथंच राहील. (लक्ष्मीस) तुला काय वाटलं होतं, मी नारायणाला घरांत ठेऊन घेईन ?

**लक्ष्मी** : हो.

**नाना** : काय–कल्पना तरी काय होती तुझी आमच्याबद्दल ?

**लक्ष्मी** : माझ्यावर तुमचा राग असल्यामुळं यांना तुम्हीं मुद्दामच ठेऊन घ्याल, असं मला वाटलं होतं.

**नाना** : मग खोटं ठरलं कीं नाहीं तें ?–काय रे नारायण ?

**नारा** : हो.

**नाना** : अरे, मोठ्यानं बोल कीं !

**नारा** : (मोठ्यानं) हो.

**बाजी** : पहा–अजून त्याला 'रिंगमास्तर' लागतो मोठ्यानं बोल म्हणून सांगायला !

**नाना** : तुझ्यासारखी बंडखोर वृत्ति नाहीं त्याची ! तुला 'बस' म्हटलं तर तूं उठणार !–सिगरेट ओढतोस कीं नाहीं तूं ?

**बाजी** : हो–कधीं कधीं.

**नाना** : (हात पुढें करीत) काढ एक. (सगळेजण आश्चर्यानें नानाकडे पाहातात. बाजीरावही त्याच वृत्तीनें खिशांतली 'सिगारेट-केस' काढून त्यांना एक सिगारेट देतो. ती तोंडांत धरून नाना त्याला पेटवण्याची खूण करतात. बाजीराव ती पेटवतो. आपलें मोठेंपण विसरून मुलांशीं मिसळण्याचा त्यांचा हा प्रयत्न पोरकटच नाहीं का ?) याला एक दे.

**नारा** : पण मी कधीं ओढीत नाहीं नाना.

**नाना** : आतां ओढायला लाग.

**नारा** : होय नाना.

**नाना** : होय नाना काय ? मी सांगतो म्हणून ओढणार आहेस ?

**नारा** : होय नाना.

**नाना** : मग नको ओढूंस. ह्या बाजीला मी कधीं सिगरेट ओढायला सांगितली होती का ? पण तो पहा–माझ्या नाकावर टिच्चून ओढीत होता. हें तुझ्यांत नाहीं. (सिगरेट विझवतात).

**नारा** : तुमची शिस्तच होती तशी.

**नाना** : बाजीनं कधीं पाळली का ती ?–अरे, आम्हां म्हाताऱ्या माणसांना उगीच तुम्हीं हें मोठेंपण देतां. एकेकाळीं आम्हींही तुमच्या एवढेच होतो. वर्षावर्षानं वाढत अखेर म्हातारे झालों, म्हणून काय आम्हांला भ्यायला हवं ? तुमच्या ह्या वागण्यामुळेंच आम्हांला आम्हीं कुणीतरी आहों, असं वाटायला लागतं. आणि तें एकदां वाटायला लागलं, म्हणजे मग जरासुद्धां कुणी आमच्या मनाविरुद्ध वागल्यावर आमची मिजास जाते ! ह्या बाजीसारखाच तूंही पहिल्यापासून वागला असतास, तर काय बिशाद होती आमची एवढ्या तऱ्हेवाईकपणानं वागायची ?

**नारा :** म्हणजे तुम्हीं इतके दिवस वागत होता, तें तुमच्या दृष्टीनं चुकीचं होतं ?

**नाना :** अलबत. अरे, कुठल्या घरांत ऐक्य आणि सुख नांदेल माझ्यासारखा बाप असल्यावर ?

**शोभा :** हियर हियर.

**नाना :** हियर हियर काय ? व्याख्यान देतो आहे का मी ?—अरे, आम्हीं म्हातारीं माणसं तुम्हां तरुणांना मोठा अनुभविकाचा आव आणून शहाणपणाच्या गोष्टी सांगायला पाहातो; पण आम्हीं म्हातारे काय जगांत थोडा गाढवपणा करतो ? केस पिकले म्हणून आम्हांला अक्कल येते, असं थोडंच आहे ! तुम्हीं आमची तशी भावना करून देतां, म्हणून आम्हांलाही वाटायला लागतं, कीं आम्हांला जास्त अक्कल आली ! हेंच पहाना, जर माझाच अनुभव तुमच्यापेक्षां जास्त असता, तर आज आम्हांला तुमच्याकडे नाक मुठींत धरून कां यावं लागलं असतं ?

**नारा :** पण नाना, तुम्हीं नाक मुठींत धरून नाहीं आला ?

**नाना :** अरे, आलो आहे !–नाहीं काय म्हणतोस ? आम्हांला नाहीं लाज वाटत कबूल करायला आणि तुला कां वाटते ?–तुम्हीं सगळे गेल्यावर आम्हीं जेव्हां दोघंच घरांत राहिलों, तेव्हां आमचा गाढवपणा ळख्ख दिसायला लागला आम्हांला !

**बाजी :** मी तेंच म्हणत होतों. तुम्हां दोघांना घर खायला येईल.

**पार्वती :** येणार नाहीं तर काय ? त्या घरांतच तुम्हीं लहानाचे मोठे झालां !

**बाजी :** त्यामुळेंच आम्हीं किती मोठे झालों, तें तुम्हांला कधीं कळून आलं नाहीं. पण आम्हीं पुरुष तरी होतों. शांता मात्र एवढी मोठी झाली—

**शोभा :** कीं अखेर तिला सेकंड-हँड नवरा पाहावा लागला !

**पार्वती :** म्हणजे तिनं लग्न केलं कीं काय त्याच्याशीं ? भेटू दे तर ती मला आतां.

**बाजी :** पहा–आईचं आपलं आहे तेंच आहे.

**पार्वती :** अरे, पण त्या प्रोफेसराची पहिली बायको जिवंत आहे ना ?

**बाजी :** हो–आहे. मी म्हणतो, त्याला आणखी चार मुलंहीं असतील. पुढें काय म्हणणं तुझं ?

**पार्वती :** मग एका घरांत दोन बायका नांदायच्या कशा ?

**बाजी :** ही फिकिर शांता आणि तिचा नवरा करील. तुला आणि मला कशाला हवी ती चिंता ! निराळं बिऱ्हाड करून देईल तो शांताला.

**पार्वती :** पण मी म्हणते, एक बायको असतांना यांना दुसरी बायको हवी असते तरी कशाला ?

**बाजी :** ऊं:–हा एक कोट असतांना दुसरा कोट नाहीं का शिवलेला मी !

**पार्वती :** तुझींही लक्षणं दिसताहेत मला तीच !

**नाना :** तो काय आणतो दुसरी बायको ही लवंगी मिरची असतांना ?

**शोभा :** असं समजूं नका हं ! मला कंटाळा आला तर सांगेन मी यांना—

**पार्वती :** काय–दुसरं लग्न कर म्हणून ?

**शोभा :** हं. जन्मभर काय त्रास सहन करायचा ! थोडा विसांवा नको का आम्हां बायकांना ?

**पार्वती :** अग, तुझ्या जिभेला कांहीं हाड ! आमची म्हाताऱ्यांची तरी लाज धर.

**शोभा** : पाहा-आलं पुन्हां म्हातारपण ! आतांच मामंजी काय म्हणाले होते, ऐकलं नाहींत का सासुबाई ? (त्यांची नक्कल करीत) "आम्हां म्हाताऱ्या माणसांना तुम्हीं उगीच हें मोठेपण देतां. आम्हीं म्हातारे काय जगांत थोडा गाढवपणा करतो !" (सर्वजण हंसतात.)

**नाना** : काय आराम वाटतो आहे माझ्या मनाला आज ! इतक्या वर्षांत हें असलं आल्हादकारक वातावरण पाहिलं नव्हतं मी !

**बाजी** : कुठून पाहाणार ? (त्यांची नक्कल करीत) "कुटुंबांतील कर्त्या माणसांचं मत तें साऱ्यांचं मत ! कुटुंबांत शांति आणि सौख्य नांदायला हवं तर प्रत्येकाला स्वतंत्र मत असून चालायचं नाहीं !" असंच आज इतकी वर्षं म्हणत आलां तुम्हीं !

**नाना** : त्यामुळं बऱ्याच घरगुती सुखाला आंचवलों मी ! आपण मुंबईंत राहावं आणि कोंकणांत आपली शेतीवाडी असावी-तशाच-पैकीं घरांत असून मी तुमच्यापासून दूर झालों होतों. आतां मात्र तुमचा संसार बघत-आणि संसारांतल्या तुमच्या घोडचुकांना हंसत दिवस घालवणार आहों आम्हीं ! लक्ष्मीचं तितकंसं कांहीं चुकायचं नाहीं, पण या बाजीराव-मस्तानीचा मात्र संसार बघतांना आमची खूप करमणूक होईल ! (पार्वतीबाईंस) काय-खरं कीं नाहीं ?

**पार्वती** : ती कसला संसार करणार ? बापाच्या घरीं ताटावरून पाटावर आणि पाटावरून ताटावर बसण्यांत जन्म गेला तिचा.

**नाना** : त्यामुळंच हा नवीन संसार पाहातांना आमची मोठी करमणूक होणार आहे. थोडे दिवस लक्ष्मीकडे आणि थोडे दिवस ह्या चिमुरडीकडे काढायचे-असंच चालायचं आतां.

**शोभा** : पण आम्हीं निराळा संसार करणार आहों, असं तुम्हांला वाटतं कीं काय ?

**लक्ष्मी** : म्हणजे ?

**शोभा** : आमच्या यांना किनई आपल्या वहिनीची भारी ओढ आहे !

**नाना** : असं असं. काय पोरटी वस्ताद आहे पहा ! इथंच मुक्काम ठोकायचा विचार दिसतो आहे लक्ष्मी, यांचा !

**बाजी** : वाः, विभक्तपणापेक्षां एकत्र कुटुंब असणं बरं नाहीं का ?– आणि शिवाय घरांत एकटा दादा असल्यावर हिला करमायचं कसं ?

**नारा** : म्हणजे मला अगदीं टाकाऊ नवरा काढलास कीं काय ?

**बाजी** : छेः छेः-तसं नाहीं. पण नाना आणि आई आमच्याकडे असलीं, म्हणजे तुला इथं करमायचं नाहीं. आणि वहिनीच शेवटीं म्हणायची–'जा तुम्हीं आपल्या आईबापापाशीं !'

**शोभा** : हं–त्यापेक्षां सर्वांनी इथंच राहिल्यावर सगळं कांहीं व्यवस्थित होईल.

**नाना** : समजतं ग आम्हांला सारं ! तुम्हांला स्वतंत्र संसाराची जबाबदारी घ्यायला नको. मग तुमचे सिनेमा–नाटकं–भटकणं कसं जमणार ? म्हणून चाललं आहे बरं हें सारं लक्ष्मी !

**लक्ष्मी** : राहिनात सारीजणं इथं.

**पार्वती** : अग, पण एवढ्याशा या जागेंत साऱ्यांना राहायला जमणार कसं ? त्यापेक्षां मी म्हणते—

**बाजी** : काय–त्या घरीं जाऊं या ?–नको रे बुवा ! तिथं गेल्यावर पुन्हां साऱ्यांचा पहिला आयुष्यक्रम सुरू व्हायचा. काय दादा ?—

**शोभा** : हो–'माझी मतं तीं कुटुंबांतील साऱ्या माणसांचीं मतं !'—

**नाना** : बसबस--फार फाजील होत चाललीस तूं !–तें कांहीं नाहीं. साऱ्यांनी इथंच राहायचं ! गर्दी झाली तरी चालेल.

**बाजी** : तरी बरं एक शांता कमी झाली !

**शोभा :** तीही नाहीं ना यायची आपल्या सेकंडहँड नवऱ्याला घेऊन इथंच !

**पार्वती :** ती नवऱ्यालाच घेऊन आली तर ठीक–पण आणखी आपल्या सवतीला आणि तिच्या मुलांबाळांनाही घेऊन आली तर मात्र उभं राहायला जागा व्हायची नाहीं.–( लक्ष्मीस ) काय ग, आहे का साऱ्यांना पुरेशी जागा ?

**लक्ष्मी :** सारीं माणसं आनंदी असली, म्हणजे अडचणीच्या जागेंतही आनंदांत राहातील. या–मी दाखवते तुम्हांला आमची जागा.

**शोभा :** काय हो बाजीराव धि थर्ड, यमानं अखेर सावित्रीला तिचा नवरा आणून दिलाच कीं नाहीं ! पाहिलंत आम्हां बायकांच्या श्रद्धेचं बळ ? यापुढं आम्हां बायकांच्या श्रद्धेची चेष्टा करूं नका. आम्हीं बायकाच तुम्हां पुरुषांना तारतो. समजलं ?

[ बाजीराव धुश्शांतच आंत जातो. शोभा हंसते. ]

**शोभा :**

**आला हंसत चंद्रमा । आला ॥**
**पाहुनिया ही मंगल वेळा । आनंदी आनंद द्याया ॥ धृ० ॥**
**किती अबोल ही भूबाला ।**
**जणुं बैसली एकली कांता । ही आतां ॥**
**आनंदली । वेडावली । अवचित पाहुनी नाथा । येतां ॥१॥**

[ गाणें संपतांच शांता व प्रो. शहाणे येतात. आतां शांतेची वेषभूषा साफ बदलली आहे. आतां तिला मावशीबाई कोण म्हणेल ? ]

**शांता :** ( शोभाला पाहून ) अं ! तूं कुठं इथं ?

**शोभा :** तुम्हीं कुठं इथं ? काय हो प्रोफेसर ?

**प्रो. शहाणे :** आम्ही आलों होतों हिच्या दादाला आणि वहिनीला लग्नाचं आमंत्रण द्यायला !

**बाजी :** ( येत ) आणि नाना, आई यांनाही आमंत्रण द्यायला आला आहांत कीं काय ?

**शांता :** छे :–त्यांच्याकडे कोण जाईल बाई ? नाना आणि आई मला फाडून खातील.

**शोभा :** मग इथं बऱ्या आलांत तुम्हीं ?

**शांता :** वा :, वहिनीला आणि दादाला आमंत्रण द्यायला आले.

**बाजी :** पण आई आणि नानाही आहेत ना इथं.

**शांता :** कुठं इथं ?

**प्रो. शहाणे :** शांता, पळ—

**शांता :** चला–चला ( दोघेही घाईघाईनें जाऊं लागतात. )

**शोभा :** पण तुमच्या वहिनीला आणि दादाला तरी आमंत्रण द्याल कीं नाहीं ?

**शांता :** तुम्हींच सांगा त्यांना आमचा निरोप. म्हणावं—
( नाना व इतर मंडळी येतात. )

**नाना :** कोण शांता ?

**पार्वती :** शांता–अग कार्टे—

**बाजी :** हं–हं–आई–(मध्यें उभा राहातो. )

**पार्वती :** अरे–मला तिला एकदा चांगली मिठी मारूं दे रे !
( बाजीला ढकलून शांताजवळ जाते व तिला आपल्याजवळ घेते. )
शांता, कशी ग गेलीस आम्हांला सोडून ?

**शांता :** तूंच तर आमच्या लग्नाला परवानगी दिलीस, नाहीं का ग ?

**पार्वती :** अग, पण त्यावेळीं मला कुठं ठाऊक होतं–तुझ्या ह्या प्रोफेसराला पहिली बायको आहे ती !

**शांता :** किनई आई, त्यांची–माझी ओळख करून दिली आहे यांनी. त्या किनई खूप चांगल्या आहेत.

**बाजी** : नाहीं तरी पहिली बायको इटकून चांगली असतेच !

**शांता** : म्हणजे मी आतां दुसरी म्हणजे वाईट होय ?–बघा हो !

**बाजी** : नाहीं म्हटलं–दुसरं लग्न करायला निघणाऱ्या माणसाची पहिली बायको इटकून साध्वी असते !–पहा, यांचंही तेंच मत आहे.

**नारा** : काय ग शांता, तुझं लग्न करायचा बेत नक्की झाला का यांच्याशीं ?

**शांता** : हो–कां ?

**नारा** : नाहीं म्हटलं–कॉलेजांतच जमवायचं होतं तर एखादा विद्यार्थी पाहिला असतास तर—

**शांता** : हो–मला मिळायला बसला आहे विद्यार्थी !

**बाजी** : पण आतां तूं कांहीं अगदींच ही दिसत नाहींस.

**शांता** : त्यावेळींही अशीच राहिले असते, तर जमलं असतं कुठं तरी चांगल्या ठिकाणीं.

**नारा** : पण त्यावेळीं तूं अगदींच मावशीबाईसारखी राहात होतीस !

**शांता** : शिक्षणच मिळालं होतं तसं आम्हांला लहानपणापासून !–हो कीं नाहीं ग आई ?

**नाना** : जाऊं दे. तूं संतुष्ट आहेस ना ? मग झालं तर. आपल्याला काय करायचं आहे ? मात्र आतां त्याला चांगला मुठींत ठेव. नाहीं तर पुन्हां कांहीं दिवसांनी तिसरी बायको करायला निघायचा.

**शोभा** : हो–काय नेम ! एकदा लग्नाची चटक लागली—

**शांता** : पण नाना–तुम्हांला माहित आहे का ?–ते कांहीं आपण होऊन लग्न करायला आले नाहींत माझ्याशीं !

**बाजी** : मग तूंच त्यांना जाळ्यांत पकडलंस कीं काय ? आतां आलं ध्यानांत !

**शोभा :** लग्नाचं आमंत्रण द्यायला आल्या आहेत त्या.

**नाना :** हो का ? केव्हां आहे लग्न ?

**शांता :** उद्यां.

**पार्वती :** अग, असं घाईघाईनं ग कसं व्हायचं ? लग्नाची तयारी नको का करायला ?

**बाजी :** छे : छे :–आई, असल्या 'सेकंड हँड' लग्नाला कांहीं तयारी करावी लागत नाहीं !

**शोभा :** ( नानाकडे पाहून डोळे मिचकावीत ) आतां उद्यां लग्न झालं, कीं सगळ्यांचा 'फॅमिलीग्रूप' काढायला हरकत नाहीं.

**बाजी :** हो–वहिनी, तुझा नऊ वारी शालु, गोठपाटल्या वगैरे काढून ठेव हं !

**शोभा :** आणि मलाही नथ हवी !

**बाजी :** आणि दादा–तुझा तो रेशमी लांब कोट आणि जरीकांठी धोतर—( सगळे हंसूं लागतात. )

**नाना :** ( खजिल होत व त्यांतही हंसत )–बरं बरं–आणि माझ्या हातांत एक चाबूकही आणून दे—

**बाजी :** ( नानाच्या भोवती पिंगा घालीत ) म्हणजे सर्कशींतली जनावरं बरोबर नाचायला लागतील ! ( सर्वजण हंसतात. )

– समाप्त –